राजकीय चळवळ सोडतील तर त्यांस सनद मिळावी. सावरकरांनीं सनदेच्या आशेनें राजकीय चळवळ सोडली नाहीं. हिंदुस्थानांत ब्यारिस्टरी सोडून देणारा पहिला वीर ब्यारिस्टर सावरकर होय.

*   *   *   *   *

यानंतरचीं राजकीय पटावरचीं स्थित्यंतरें विद्युद्वेगानें घडावयास लागलीं इतकें हिंदी क्रांतिकारक व सरकार यांच्यामध्यें धुमसत असलेला क्रोधाग्नी प्रज्वलित होऊन त्याच्या ज्वाला इकडे हिंदुस्थानांत व तिकडे लंडनमध्यें क्षणाक्षणाला व दिवसा दिवसाला भडकूं लागल्या. १९०९ चा जून अगर जुलई असेल त्यावेळीं सबंध इंग्लंड व हिंदुस्तान यांना विस्मयानें स्तिमित करणारा कर्झन वायली व लालकाका यांचा खून भर लंडन शहरांत झाला. मदनलाल धिंगडा या नांवाच्या हिंदी तरुणानें हा खून केला असें मागाहून सिद्ध झालें. नाना तर्क केले अखेर मदनलाल धिंगडानें जबानींत कथन केलें कीं ' हिंदुस्थानांतील तरुण देशभक्तांस ज्या अन्यायाच्या फांशीच्या वा हद्दपारीच्या शिक्षा झाल्या त्याचा मी सूड उगवण्याकरतां हें कृत्य केलें. '

*   *   *   *   *

डिंगराच्या या कृत्यानें सर्व इंग्लंडमध्यें एकदम खळबळ उडून गेली. इंग्लंडमध्यें असलेल्या हिंदी लोकांनीं निषेध करण्याकरितां सभा, लेख, व्याख्यानें यांची झोड उडवून दिली. भावनगरी, सुरेंद्रनाथ बानर्जी, पालबाबू, खापर्डे इत्यादि अनेक पुढाऱ्यांनीं डिंगराची चौकशी आरंभलीहि नव्हती तोंच त्या कृत्याचा निषेध करण्याकरितां सभा भरविली. अनेक अँग्लो इंडियन सभेस होते. अनेक इंग्लिश लोकही आले होते. डिंगराच्या प्रत्यक्ष बापानें विलायतेस तार दिली कीं, " असला कारटा माझ्या पोटीं आला ही केवढी लज्जास्पद गोष्ट ! मला वाटतें तो माझा मुलगाच नव्हे ! !" सभेंत डिंगऱ्याच्या दुष्कृत्याची, खुनाची, माथेफिरूपणाची यथास्थित निंदा झाल्यावर असल्या खुनी व भ्याड नीचाच्या नीच कृत्याचा आम्ही तीव्र

निषेध करतों असा ठराव पुढें आला व सभेंतील लोकांत कोणी त्यांना अमेंडमेंट–पुस्ती जोडणार आहेत हें माहीत असतांही दाबून तो " सर्वानुमतें संमत झाला म्हणून अध्यक्ष व मुख्य चालक आगाखान व भावनगरी मोठमोठ्यानें ओरडूं लागले !

* * * * *

मँचेस्टर गार्डियन म्हणतें, इतक्यांत " No ! No ! not unanimously ! " म्हणून एक ध्वनि सभेमधून उठला. कोण ? कोण विरुद्ध आहे ? म्हणून सर्व हिंदी पुढारी व अँग्लोइंडियन चवताळून ओरडूं लागले ! " मी " म्हणून कोणी म्हणालें. त्याचें नांव काय ? हुसका त्याला ! बसवा त्याला ! पोलीस ! भावनगरी तर ओरडत उठले " लाथ मारून हांकून द्या त्याला ! ! कुठें आहे तो ? " " हा मी येथें आहें व माझें नांव सावरकर आहे; माझें मत ह्या ठरावाच्या विरुद्ध आहे ! " अत्यंत शांतपणें पण उंच स्वरात उत्तर आलें. सर्व वळून पहातात तों एक सडसडित बांध्याचा तरुण सभेंत उभा आहे. " Youth and intelligence were stamped upon his face " तारुण्य व बुद्धिमत्ता त्याच्या चेहऱ्यावर तळपत होती. " मारा हाणा " असा एकच गोंगाट उठला, कारण सर्वांस सावरकरांस पाहतांच भीति पडली कीं, बहुतेक हा क्रांतिकारकांस घेऊन इथें बॉंबबिंब फेंकण्यास तर आला नाहीं ! इतक्यांत एक दांडगा युरेजियन म्हणजे निमगोरा साहेब भावनगरीच्या चिथावण्यानें सरसरत पुढें घुसला व त्यानें सावरकरांच्या डोळ्यावर बळकट ठोसा मारला. चष्मा फुटला. रक्त भळभळ वाहूं लागलें. तोंड व कपडे त्यांत भिजून लाल झाले. तरीहि क्षणमात्र चंचल न होतां व प्रतिकार न करतां सावरकर अधिकच शांतपणें च दृढतर स्वरानें म्हणाले, " तरीहि माझें मत या ठरावाचे विरुद्धच आहे ! "

* * * * *

सावरकरांस रक्तबंबाळ पाहतांच तें न साहून एका हिंदी तरुणानें त्या युरेजियनाचे डोक्यांत हातांतील लाठी घातली. त्याचें डोकें फुटलें. रक्त भळभळ वाहूं लागलें; तोंड व कपडे त्यांत भिजून चिंब झाले. तो धडपड करीत खुर्चीवर पडला.

* * * * *

झालें. सभेंत एकच हांकाहांक झाली. कांहींतरी संकट कोसळलें आहे अशा भयानें कुणी खुर्चीवर तर कुणी बांकाखालीं दडले. इंग्लिशास वाटलें कीं, डिंगराप्रमाणेंच एथेंही खून पडणार ! सभेंतून निघून निसटून जाण्यासाठीं एकाएकीं इतकी धांदल उडाली कीं, दारांत इंग्लिश मडमा चेंगरून ओरडूं लागल्या. पोलिस आले. व त्यांनीं भावनगरीचे सांगण्यावरून सावरकरांस अटक केली ! सुरेंद्रनाथ बानर्जी “ सावरकरांस मारणें अत्याचार होय ” असें म्हणून उठून गेले ! सभा उधळली ! ठराव केराचे टोपलींत पडला ! क्रांतिकारकांचा बेत सिद्धिस गेला ! !

* * * * *

कांहीं तासांनीं सावरकरांस कांहींच आरोप न ठेवतां आल्यानें सोडून दिलें. व उलट विचारलें कीं, तुमची फिर्याद असल्यास त्या युरेजियनास पकडतों. सावरकरांनीं तें नाहीं म्हटलें. सुटतांच सावरकरांनीं “ टाइम्स ” मध्यें आपल्या वर्तनाचें स्पष्टीकरण धाडलें तेंच दुसरे दिवशींच्या लंडनमधील पत्रांतील विषय होऊन बसला होता. सावरकरांनीं लिहिलें होतें कीं, ज्या मनुष्याची चौकशी न्यायासनापुढें अजून व्हावयाची आहे व ज्यानें तें कृत्य कां केलें त्या विषयीं मोठमोठे अधिकारी वेडेपणाच्या भरांत वा घरगुती द्वेषानें केलें असें ते म्हणत आहेत त्याचें तें कृत्य राजकीयच आहे असें गृहीत धरून त्याचेवर तो दोष सिद्ध आहे हें समजण्यांत न्यायालयाचा व समंजसपणाचाही उपमर्द होत आहे. तें कृत्य राजकीय नव्हे असें ठरलें तर ? म्हणून निषेधाची अशी घिसाडघाई करूं नये. आजपर्यंत कित्येक इंग्लिश सोजि-

रांनीं हिंदी माणसांस मारलें आहे. पण त्यावेळेस कोणी इंग्लिश लोक न्यायालयाचा निर्णय होण्यापूर्वी अशा सभा करतात कीं काय? क्वचित् तशा सोजिरांप्रमाणेंच दारूचे गुंगींत हें कृत्यही झालें असेल! काय तें न्यायालयांत ठरे तोंपर्यंत स्वतः इंग्लिश लोकांनीं डिंगराच्या निषेधाची एकहि सभा भरविली नसतां त्याच्याच देशबांधवांनीं स्वतःच न्यायालय बनण्याइतका घाबरेपणा प्रदर्शवूं नये अशी आपण ठरावास उपसूचना आणणार होतों. तोंच एक मतानें ठराव ग्राह्य म्हटलें असतें म्हणजे झालें असतें! पण तें कांहीं एक न करतां काल्पनिक बॉंब गोळ्यांचीं चित्रें पाहून सगळे जणांनीं एकदम पळापळीस आरंभ केला व अन्यायानें मजवर आघात केला!" हें पत्र टाइम्समध्यें येतांच शिवराळ पत्रें चूप बसलीं व कोणी कोणी सावरकरांचें समर्थनही केलें. सुरेंद्रनाथ बानर्जी यानंतर जेव्हां विलायतेहून परत मुंबईस आले त्यावेळीं राष्ट्रमताच्या प्रतिनिधीनें त्यांची भेट घेतली तेव्हां त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, सावरकरांचें म्हणणें अगदीं न्याय्य होतें व त्यांच्यावर केलेला आघात हा अत्याचार होता!

* * * * *

पण ज्याचे डोक्यांत घाव लागलेला होता त्या निमगोऱ्या साहेबास चैन पडेना. त्यानें पूर्ण गोऱ्या साहेबांत मिसळण्याची ही अपूर्व संधि आहे असें समजून टाइम्समध्यें प्रसिद्ध केलें कीं, मीच तो गृहस्थ कीं ज्यानें सावरकरांस "a genvine Britise blow!" एक अस्सल ब्रिटिश ठोसा दिला! त्याच्या या बदमाष प्रौढीस दुसऱ्याच दिवशीं टाइम्समध्यें "ब्रिटिश ठोश्याचें डोकें दुभंग करणारी "a Straight Indian Lathi एक सरळ इंडियन लाठी!" या सहीनें एक चरचरीत उत्तर दिलें गेलें!

* * * * *

पण आतां मात्र लंडनचे पोलीस हिंदी तरुणांचे मागें छायेसारखे लागले. सावरकरांच्या नेतृत्वाखालीं हिंदी तरुणांनींही स्काटलंड–यार्ड ह्या लंडनच्या

पोलिसच्या मुख्य ठाण्याला पुरे पुरे केलें. त्या गमती सांगू लागलें तर एक ग्रंथ होईल. इतक्यापर्यंत तोंडीस तोंड उठत गेली कीं, कधीं कधीं पोलिसांनीं हिंदी संस्थेंत डिटेक्टिव्ह घुसवावेत तर कधीं हिंदी तरुणांनीं पोलिसच्या ऑफिसांत आपले डिटेक्टिव्ह ठेवावेत. कांहीं विश्वासूक हिंदी तरुण पोलिसांमध्यें डिटेक्टिव्ह म्हणून नौकर राहून त्यांचाच पगार खाऊन उलट त्यांची बित्तं बातमी सावरकरांस पोंचवीत व उलट सावरकर सांगतील तितकीच बातमी व कधीं कधीं तर पोलिसांस भलत्याच मार्गांत फसविणारी बातमी ते नेऊन पोलिसांस देत. उत्तर हिंदुस्तानांत प्रसिद्ध असलेले असे एक कार्यकर्ते आहेत कीं, ज्यांच्याबद्दल ते पोलिसांमध्यें आहेत अशी वदंता मोठमोठ्या लोकांत पसरली होती. त्यांना स्वतः विचारतां त्यांनीं स्पष्ट असेंही सांगितल्याचें नागपूर कॉंग्रेसमध्यें आमचे ऐकण्यांत आलें कीं, होय; मी लंडनमध्यें पोलिसखात्यांत नौकर होतों. परंतु तो लोकपक्षाच्या बातम्या देण्याकरतां नव्हे तर गुप्त पोलिसांच्या बातम्या लोकपक्षाला देण्याकरतां होतों. व खुद्द सावरकरांच्या संमतीनें मला ही कामगिरी (Duty) सांगितली गेली होती. त्या वेळीं लंडनमध्यें असलेले गृहस्थ असेंही सांगत होते कीं, असाच एक गृहस्थ लंडन गुप्त पोलिसांत असतांना तो उमगला गेला व त्यास पकडण्यास वारंटही सुटलें होतें, तोंच त्यांस ही बातमी कळून तो रात्रीचे रात्रीं पॅरिसला निसटून गेला. हे एक मद्रासी गृहस्थ होते व हल्लीं ते तिकडेच आहेत असें म्हणतात.

* * * * *

त्या हिंदी तरुणास रहावयास जागा नाहीं, शिकावयास शाळा नाहीं, बोलावयास कोणी धजत नाहीं, घरचे कोणी संबंध ठेवीत नाहींत व अहर्निश देशासाठीं झटत, झगडत असतां, लोकांस त्याचें नांव माहीत होऊन मिळणाऱ्या कीर्तीचेंही, गुप्तपणें काम करावें लागल्यानें लवलेश समाधान नाहीं. पण अशा स्थितींतही त्यांनीं त्याचें व्रत अखंड व अधिकच नेटानें चालविलें.

प्रतिरात्रीं निजावयास जावयापूर्वी दिवसा केलेल्या खटपटींचा आढावा काढून व उद्यां करावयाच्या खटपटी व कामें वाटून घेऊन ते उभे राहात व गंभीर-पणें आपल्या राजकीय प्रतिज्ञांची Their political catechism ची त्यांच्या राष्ट्रव्रताच्या ब्रीदांची घोषणा करीत सर्वजण एक स्वरानें उच्चारीत!" हिंदुस्थान स्वतंत्र झालेंच पाहिजे! हिंदुस्थान एकराष्ट्र झालेंच पाहिजे! हिंदुस्थान लोकसत्ताक झालेंच पाहिजे! हिंदुस्थान एकभाषी झालेंच पाहिजे! हिंदुस्थान एकलिपिक झालेंच पाहिजे! ती लिपी नागरी होय. ती भाषा हिंदी होय. ती लोकसत्ता म्हणजे राजा वा अध्यक्ष यांपैकीं कोण वरणीय हा प्रश्न नसून राजा असो वा अध्यक्ष असो तो लोकांनीं निर्वाचित केलेला व तो निर्वाचित आहे तोपर्यंतच अस्तित्वांत राहाणारा ज्या राष्ट्र संस्थेंत असतो ती राष्ट्रसंस्था होय!"

* * * * *

सांगणेंच नलगे कीं, जर सर्वसाधारण देशसेवकांच्या मागें इतकें पोलीस लागलेलें होतें तर त्यांनीं सावरकरांच्या मागें जाचाची परमावधीच केलेली असेल! सावरकरांस घरच्या प्रियजनांचीं पत्रें मिळण्याचीही चोरी झाली! दरमेलनें कोणी तरी प्रवासी त्यांच्या कुटुंबावर गुदरलेला कोणचातरी नवा अनर्थ येऊन सांगे. त्यांच्या दूरदूरच्या आप्तांसही छळण्याचा सपाटा चालला. कोणाच्या नौकऱ्या गेल्या! कोणाचे धंदे बुडाले! कोणाच्या मत्ता व सर्व धन जप्त झालें. त्यापैकीं कोणी शिव्यांची लाखोलीही वाहूं लागले व या कुळकलंकानें आह्मांस नागवलें म्हणून म्हणूं लागले! कोणाशीं बोलूं जावें तर तो तोंड फिरवी, कोठें उतरावयास जावें तर डिटेक्टिव्ह डोळे वटार-तांच त्या घरवाल्यानें अथवा खाणावळवाल्यानें त्यांस दार बंद करावें, एकदां तर असेंच बिऱ्हाड-पैसे देऊन! पहातां पहातां थकून अखेर एका हाटेलांत स्थळ मिळालें. सामान आणून खालच्या खोलींत ठेवून हुश्श करून ते बसले. त्यांचा एक प्रिय मित्र होता तोही त्या दिवशीं येऊं शकला नाहीं. भाकट्या

भावास मिंटोचे प्रकरणांत अटक झाली होती तिचें पुढें काय झालें तें कांहींच कळेना. कारण पत्रें सगळीं पोस्टांत गडप होत! वर्तमानपत्रांत तरी बघावें म्हणून हिंदुस्थानी एक दोन वर्तमानपत्रें उघडलीं. इतक्यांत हाटेलाचा धनी आला व ह्मणाला, "Sir I am sorry I cannot keep you here, you must quit this room! The police are after me I shall loose my job!" (महाराज? मी आपल्याला राहूं देण्याला असमर्थ आहे. याबद्दल मला वाईट वाटतें. तुम्ही ही खोली आतां सोडली पाहिजे. पोलिस मला त्रास देत आहे. माझा धंदा बुडेल!) तेव्हां निरुपाय झाला. अर्ध्यारात्रीं विसावा न घेतां तसेंच बाहेर पडावें लागलें! बिऱ्हाड मिळेना! अक्षरशः भर लंडन शहरांत डोकें टेकावयास स्थळ मिळेना!! पैसे देऊन स्थळ मिळेना!!? बरें लंडन सोडावें तर जावें कोठें? हिंदुस्थानांत? ती चिरप्रिय व चिरआकांक्षित आशा भग्न झालेली! खावें काय? ब्यारिस्टरी करून? जी वर्तणूक सुधारल्यानें ब्यारिस्टरी त्याच क्षणीं मिळूं शकती ती वर्तणुक सुधारणें तर या जन्मांत शक्य नाहीं. देशसेवेचा तो छंद, तें व्यसन सुटणें या जन्मांत तर शक्य नाहीं! प्रकृती तर दिवसें दिवस खंगत चालली!!

* * * * *

अशाच एका समयीं ब्रायटनला ते विश्रांतीसाठीं गेले असतां समुद्रकांठीं एकाकीं बसले असतांना तो सूर्यास्त पाहून त्यांना हिंदुस्थानच्या सिंधुतटावरील सूर्यास्ताची आठवण झाली व सहज छंद धरतां धरतां रचलेलें पद शेवटीं दिलें आहे.

---

# प्रकरण ६ वें.

## पॅरिस व इंग्लंडमधील धरपकड.

पुढें लगेच "तरवार" नांवाचें पत्रही त्यांनीं काढलें. हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे कीं, त्यापत्रांत त्यांनीं आरंभींच हें सांगितलें होतें कीं "जेथें सत्यमत प्रतिपादनास प्रतिबंध असेल तेथेंच गुप्तसंस्था अपरिहार्य व म्हणून न्याय्य होत. जेथें राष्ट्रसंस्थेच्या विकासाला व नैसर्गिक उत्क्रांतीला बलात्कार वाव ठेवीत नसेल तेथेंच क्रांतीचा आघात न्याय्य आहे. राज्यघटनेच्या सौम्य मार्गानें लोकांस आपलें मत जेथें स्थापित करतां येतें अशा इंग्लंड फ्रान्स इत्यादि देशांतून शांतीचे वैध प्रयत्न सोडून क्रांतिकारक गुप्त चळवळी कोण करील तर मात्र तो आततायीपणा होईल. असा शांतीचा, राज्यघटनेचा ( Constitutional ) वैधमार्ग आमच्या देशांत शक्य होतांच आम्ही गुप्त व सशस्त्र प्रतिरोध मोठ्या आनंदानें सोडून देऊं. हिंदुस्थानास स्वातंत्र्य मिळविणें आहे—फार इच्छा आहे कीं, शांतीनें व शांतिनेंच तें मिळवावें. परंतु तुमचा बलात्कार तें अशक्य करतो म्हणून आम्हीही बलानेंच तो बलात्कार हाणू पहातों." सावरकरांनीं हें तरवार पत्र आपले नवागत मित्र वीरेन्द्रनाथ चट्टोपाध्याय यांचेकडे सोपविलें होतें. १९१८ सालीं विनायकरावांनीं सुधारणांबद्दल जें मत दिलें होतें तेंहि याच अर्थाचें होतें कीं 'It is a mockery to talk of constitutional agitation where there is no constitution at all. But it a greater mockery-even a crime-to talk of revolulion when there is a constitution, that allows the fullest development of a nation.'

* * * * *



सावरकरांना ब्रांकाइटसची व्यथा होऊन ते आरोग्यभवनांत वेल्समध्यें जाऊन राहिले होते. संध्याकाळचीं पत्रें येऊन गेलीं. पण डॉक्टरनें सावरकरांस पत्रें वाचणें मना केलें होतें. इतक्यांत एक एका इंग्लिश पत्राचे संपादक त्याच भवनांत आजारी होते. ते सावकरांकडे येऊन त्यांनीं त्यास एक तार दाखविली. तिचा आशय असा होता "गणेश दामोदर सावरकर यांचे अपिलांत त्यांची जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा स्थिर झाली. त्याचप्रमाणें अनंता कान्हेरे यांनीं नाशिकच्या कलेक्टराला गोळी घालून मारलें !

* * * * *

दुसरे दिवशींपासून इंग्रजी पत्रें सावरकरांचें उघड नांव घेऊन या सर्व असंतोषाचें व अत्याचाराचें तेच मूळ आहेत म्हणून म्हणूं लागलीं ! एकच गवगवा झाला. सावरकरांच्या सर्व सहकाऱ्यांनीं सावरकरांनीं फ्रान्सला निघून जावें म्हणून विनंति केली. सावरकरांनीं आपण कार्य सोडून जाऊं इच्छित नाहीं असें सांगितलें. परंतु हिंदी तरुणांनीं आग्रह धरला कीं, " आपली प्रकृति व आपलें स्वतंत्र मुक्त रहाणें हें आम्हांस, कार्यांतलें कार्य वाटत असल्यानें आमचा आग्रह कीं आपण फ्रान्सला आलेल्या मनुष्याबरोबरच निघून जावें." प्यारिसहूनही तशाच तारा व पत्रें आलीं. तेव्हां आजारीपणांतच सावरकरांना इंग्लंडमधील सहकाऱ्यांस व स्नेह्यांस मागें सोडून जातांना हिंदुस्थान सोडलें तेव्हां जितकें विरही व उदास वाटलें तितकेंच त्यांस आतांही वाटलें !

* * * * *

प्यारिसला येतांच आपल्या या तरुण अध्यक्षाचें सर्वांनीं मनापासून स्वागत केलें, आतां लंडन सुटून प्यारीस त्यांच्या राष्ट्रीय यत्नांचें केंद्रस्थान होऊं लागलें. तेथें ते म्याडम कामा यांच्या घरीं राहूं लागले. ह्या बाईनीं त्यांचेवर मुलापेक्षांही जास्त प्रेम करून त्यांची व्यवस्था ठेवल्यानें ते लवकरच बरे झाले. या बाई " वंदेमातरम् " नांवाचें इंग्लिश वर्तमानपत्र चालवीत असत. व अमेरिका, जर्मनी व इतर देशीं हिंदुस्थानाच्या आकांक्षांची व चळवळींची

माहिती व व्याख्यानें देऊन मिशनऱ्यांनीं रेखलेलीं हिंदी लोकांचीं भेसुर चित्रें कल्पनेच्या भिंतीवरून हिसडून काढून टाकीत. त्यांनीं प्रथम दादाभाईंच्या निवडणुकीच्या प्रसंगीं त्यांचे हाताखालीं काम केलेलें होतें. पुढें त्या होमरूल सोसायटींत आल्या व निःशस्त्र प्रतिकाराच्या धर्मास धरून राहिल्या. परंतु नंतर त्यांस तें सर्व फोल वाटून त्या अभिनवभारतांत शिरून त्यांतील एक प्रमुख सभासद होऊन बसल्या.

* * * * *

एकदां म्याडम कामाबाई जर्मनीमध्यें गेलेल्या होत्या तेथें जर्मन लोकांचें अखिल सोशियालिस्ट युनियन भरलें होतें. त्या विस्तीर्ण सभेंत कामाबाई साठीं एक हिंदी ललनाग्रणी म्हणून कौतुकानें आमंत्रण दिलेलें होतें. तेथें जाण्याचें आधीं कामाबाईंनीं एक तिरंगी सुंदर ध्वज अभिनवभारतासाठीं सज्ज केलेला होता तो बरोबर घेतला. जेव्हां सभेंत त्यांस बोलावयास आग्रह झाला तेव्हां हिंदुस्थानांतील राज्यक्रांती या विषयावर त्यांनीं व्याख्यान देण्यास आरंभ केला. थोड्याच वेळांत हिंदी महिलेचा तो रेशमी व बहुमोल साडीचा वेष, तें तेज, तो आवेश पाहून सभा आश्चर्यचकित झाली. जो तो ह्मणूं लागला, " She is an Indian princess. " ती एक हिंदुस्थानांतील राजकुमारी आहे, इतक्यांत तो ध्वज एकाएकीं उचलून व फडकावून कामाबाई स्फूर्तिदायक आवेशानें ह्मणाल्या, " This is the flag of Indian Independence. Behold it is boon ! It is already sanctified by the blood of the martyred Indian youths ! I call upon you, gentlemen ! to rise and salute this flag of new India of Indian Independence. " " हा बघा हिंदवी स्वातंत्र्याचा ध्वज. पहा, हा उदय पावला ! हिंदी तरुण हुतात्म्यांच्या रक्तानें हा आधींच पावन झालेला आहे ! नागरिक हो ! उठा, आणि या अभिनव भारताच्या—या हिंदवी स्वातंत्र्याच्या—

ध्वजाचीं वंदना करा ! कामाबाईचीं हीं वाक्यें एखाद्या घणाच्या आघातासारखीं त्या सभेच्या वातावरणांत दणदणत शिरलीं ! हातानें तो ध्वज आवेशानें फडकावीतच त्या जेव्हां हे आव्हान देत्या झाल्या तेव्हां ती सभा एकदम चित्रासारखी उभी राहिली व स्वतंत्र हिंदुस्थानच्या जगामध्यें प्रथमच उभारलेल्या त्या ध्वजास वंदना ( Salute ) देती झाली !

* * * * *

प्यारीसला आतां हिंदुस्थानांतील कान्हेऱ्यांच्या कटाचा कोर्टातील वृत्तांत येऊं लागला. कोर्टांत गोऱ्हे, देशपांडे, खरे इत्यादिकांनीं जें सांगितलें कीं, आमच्याकडून वृत्त काढून घेण्यासाठीं पोलिसांनीं छळ केला, तीही बातमी आली. पोलिस म्हणाले कीं, हें सर्व खोटें, छळवीळ कांहीं झाला नाहीं तीहि बातमी आली. खरें कांहींच कळेना. इकडे लंडनमध्येंही मागें उरलेल्या हिंदी तरुणांस वारंटें सुटणार अशी भूमका उठल्यानें त्यांनींही लंडन सोडून जावें अशीं बोलणीं आरंभिलीं गेलीं. पण सगळ्यांनीं लंडन सोडलें तर तेथें काम तरी कोण करणार ? बरें आपण त्यांस लंडन सोडूं नका ह्मणावें तर त्याचा विपर्यासही कोणी करूं शकेल. इंग्लिश पत्रें तर ह्मणणारच. व ह्मणतच होतीं कीं, स्वतः आगी बाहेर राहून इतर अपक्क तरुणांस सावरकर आगींत ढकलीत आहेत. तरी बरें ह्या तरुणांपैकीं बहुतेक सर्व लोक डिंगरासुद्धां—सावरकरांपेक्षां दोन पावसाळ्यांनीं वडीलच होते. तेव्हां जें होईल तें होईल. आपण प्यारिसला न राहतां इंग्लंडमध्येंच जावें. ह्मणजे धरले गेलों तर निदान कार्य मरेतों केल्याचें समाधान लाभेल व एका महान् स्वार्थत्यागाचें शिक्षण व धडा राष्ट्रापुढें आपल्या मरणानें ठेवला गेल्यानें इतरांसही तसेंच झुंजत राहण्याची स्फूर्ती येईल. बरें न धरलों गेलों तर लंडनमध्यें प्यारिसपेक्षां अनेकपटीनें जें राष्ट्रकार्य करतां येण्यासारखें आहे तें करतां येईल व इतरांस लंडन सोडून जाऊं नका असें सांगण्यास आपणांस अधिकार प्राप्त होईल. शत्रूंचे कुतर्कही खुंटून जातील. सावरकरांस वारंवार

असें वाटे, पण प्यारिसचे मित्र तो बेत खुडून काढीत. अशा द्विधा स्थितात कांहीं दिवस गेले.

*   *   *   *   *

सावरकरांना प्यारिसहून लंडनमध्यें परत येण्यास काय काय बनाव कारणें झालीं याची रहस्यमय हकीगत अजूनही पूर्वीप्रमाणेंच गूढाच्या छायेनें आवृत आहे. ती ज्यावेळीं खुद्द सावरकरच सांगतील त्याच वेळीं आपणांस कळेल. तोंपर्यंत हें एक इतिहासाला गूढच म्हणून राहणार. तरीही इतकें मात्र खरें कीं, पुढें वर्णन केलेली गोष्ट, जीं अनेक कारणें घडलीं त्यांतील एक कारण होती असें त्यांच्या एका निकटवर्ति स्नेह्यानें सांगितलें आहे. ती हकीगत अशीः—प्यारिसमध्यें एक सुंदर क्रीडानदी केलेली आहे. त्या बाजूस एक दिवस सावरकर व त्यांचे सहकारी मित्र हरदयाल फिरावयास गेले. हरदयाल हे प्रथम सिव्हिल सर्व्हिसची परिक्षा देण्यास सरकारी शिष्य-वृत्तीनें इंग्लंडला आले होते. पण तेथें त्यांचा मतविकास होत होता. ते अभिनवभारताचे गोटांतील एक प्रमुख कार्यकारी झालेले होते. त्या सुंदर क्रीडा नदीवर अनेक ओळखीचे हंसजातीय पक्षी क्रीडा करीत होते. नाना फुलें फुललेलीं होतीं. कृत्रिम धबधबे मंजुळ पतन घेत घेत नदींत उतरत होते. तो शुद्ध सुगंधित वायु खोल श्वासोश्वास करीत वैद्यांनीं सांगितल्या-प्रमाणें ते उभयतां नदीकांठानें क्षणभर हिंडले. तों एक मराठी वर्तमान-पत्र खिशांतच राहिलेलें होतें तें वाचावयास सावरकरांनीं हातांत घेतलें. परमप्रिय स्नेह्यांवर, जीव कीं प्राण असलेल्या धाकट्या भावावर, सहकारी संवगड्यांवर, लाडक्या शिष्यांवर, पूज्य देशभक्तांवर देशांत हे प्रसंग, हे छळ, हे बंदिवास गुजरत असतां मी येथें क्रीडानदीवर पक्ष्यांची व फुलांची सुंदरता पहात रमतों आहें ना ! माझ्या उपदेशानें प्रेरित होऊन, माझ्या शब्दांबरोबर आपला प्राण देणारे हे माझे आप्त इष्ट व देशबांधव तिकडे जाच, छळ सोशीत असतांना व तुरुंगांतील अंधाऱ्यांतून अन्नाशिवाय

कुजत पडले असतांना मी प्यारिसमधील शुद्ध सुगंधित वायु सेवन करून खोल खोल श्वासोश्वास करीत हिंडावें ना! हाय! हाय! त्यांस हें कळेल तर ते मला नीच म्हणून म्हणणार नाहींत काय! त्यांनीं म्हटलें तर त्यांचा काय दोष!

हे व असलेच विचार सावरकरांच्या डोक्यांत काहूर करून उठले व त्यासरशीं हा अभिजात कुलांत उत्पन्न झालेला, उच्च ध्येयाकडे भरारी मारणारा, स्वतःच्या प्राणांस लीलेनें मातृभूमीकरितां हवन करण्यास सिद्ध झालेला हा उदार, भावनाप्रधान तरुण निश्चय करून उठला कीं, "मी परत लंडनला जाणार! मी माझे भाऊ, स्नेही, सहकारी अशा अनेक देशवीरांबरोबर पहिल्या सरबत्तींतच देशाच्या कामास येणार! मी पॅरिसला रहाणार नाहीं. सगळेच मागें राहिले तर मरणार तरी कोण! जो तो विजय पहावयास इच्छूं लागला तर लढाईचे तोंडावर उभा राहून विपक्षाची पहिली फैर छातीवर झेलणार तरी कोण! छे, मी जाणार!!

* * * * ७

पंडित शामजींचा सावरकरांवर अतिशय लोभ असे. ते वारंवार म्हणाले छे! छे! आपण जाऊं नये! "Thou art a general! Thou must not go to the trenches." आपण सेनापति आहां! आपण लढाईच्या तोंडावर जातांकामा नये, सेनापती का कधीं सायपर्स व मायनर्समध्यें जातो!" सावरकर हें ऐकून अधिकच लाजत. त्यांस वाटे कीं, जे तोंडावर फौजेंत धरले गेले त्यांस शिपाई म्हणावें व आपण जे मागें मागें कातडें बचावून रहातों त्यांनीं जनरल म्हणवावें हें कसेंसेंच दिसतें. मी तोंडावर जातों. धक्काधक्कींत गोळागोळींत सुटून पुन्हां जिवंत आलों तर जनरल म्हणवीन व मागें राहीन! सगळ्यांनीं मोडा घातला पण ह्यांनीं जातोंच म्हटलें. आणखी कांहीं कारणें त्यांच्या पॅरिसहून लंडनला जाण्यास झालीं होतीं पण तें सविस्तर वृत्त जेव्हां ते स्वतःच प्रसिद्ध करतील तेव्हां कळेल. तेथें अति संक्षेपतः अगदीं प्रसिद्ध असलेल्या व कांहीं त्यांच्या

विश्वासू मित्रांच्या तोंडून ऐकलेल्या शब्दांचींच काय तीं अवतरणें देणें शक्य आहे.

*  *  *  *  *

हें साल १९१० चें होतें. शेवटीं सावरकर लंडनला जाणाऱ्या बोटींत चढले. स्टेशनवर प्यारीसमधले सर्व हिंदी लोक, व्यापारी व विद्यार्थी पोंचविण्यास आलेले होते. त्या सर्वांचें सावरकरांवर विलक्षण प्रेम व विश्वास होता. त्या सर्वांस त्यांनीं पुनः पुन्हां सांगितलें कीं, आतां येतों!" "Upto this time yon have seen how I tried my best to work much. Now let me see if I can also suffer much!" "आजपर्यंत शक्य तितकें काम करण्याचा प्रयत्न मी करीत आलों आतां शक्य तितकें पुष्कळ सहन करण्याची अनुज्ञा असावी!" गाडी चालू झाली. बोटही चालू झाली. इंग्लंडला लागली. सावरकर उतरले व गाडींत बसले. डब्यांतच पोलिसांचा गुप्तपणें कडेकोट सशस्त्र पहारा होता. लंडनच्या स्टेशनांत ट्रेन घुसली. सावरकरांचा डबा येतांच "इथेंच! इथेंच!" म्हणून लष्करी आज्ञा क्रूर व कठोर ध्वनीनें सुटून तो डबा व सावरकर घेरले गेले!!

*  *  *  *  *

दुसरे दिवशीं ही बातमी सर्व जगांतील पत्रांत फडकली. सावरकरांच्या मित्रमंडळीवर तर ही अकल्पित वीजच कोसळल्यासारखें झालें. कोर्टांत पोलिसांचा पहारा असतांही लोकांची दाटी झाली. सावरकरांना डॉकमध्यें आणतांच प्रेक्षकांचा आदर अनावर होऊन टाळ्यांचा कडकडाट झाला. इंग्लिश पत्रांनीं फोटो काढण्याचा सपाटा चालविला! सावरकरांस सांगण्यांत आलें कीं, मरण वा जन्मठेप काळेंपाणी या दोनच शिक्षांतून एक कोणची तरी शिक्षा असलेल्या १२१ इं. पि. च्या कलमाखालीं आपणांस धरलेलें आहे!!

इंग्लडच्या ब्रिस्टन जेलमध्यें त्यांस कोंबण्यांत आलें. इथेंच ते डिंग-रास भेटावयास मागें आलेले होते. तेथील त्यांच्या दिनचर्येची, त्यांस तेथून पळवून नेण्यासाठीं झालेल्या विलक्षण कटांची, त्यांच्यासाठीं भेटावयास येणाऱ्या स्नेह्यांत लागणाऱ्या चढाओढीची, त्यांच्यावरील खटल्यांतील व अपीलांतील डावपेंचांची, त्यांच्यासाठीं उभारलेल्या फंडांत हिंदीच काय पण आयरिश लोकांनींहि वर्गणी व सहाय्य कसें दिलें त्याची व जज्जांनीं हिंदुस्थानांत त्यास धाडावें अशी शेवटीं आज्ञा केली तेव्हांच्या त्यांच्या भाषणाची अत्यंत मनोरंजक व मर्मभेदक माहिती या संक्षिप्त चरित्रांत सांगतां येत नाहीं यास आमचा निरुपाय आहे.

*　　*　　*　　*　　*

अखेर इंग्लंडांतून हिंदुस्थानांत विनायकरावांना धाडावें असें अपील कोर्टानें फरमाविलें. हिंदुस्थानांतील कोर्टासमोर जाणें म्हणजे फांशी वा अंदमानला जाणें होय हें निश्चित होतें. म्हणून आपले सालिसिटरहस्तें विनायकरावांनीं आपल्या वहिनीस आपलें "मृत्युपत्र" लिहून धाडलें. आपणांस पुन्हां कोणाला स्वतंत्र पत्र लिहितां येणें व कोणाशीं बोलणें बहुशा शक्य होणें नाहीं. म्हणून या जगतांत आपल्या प्रेमाच्या माणसाशीं उच्चारला जाणारा तो आपला शेवटचा संदेश आहे असें समजून त्यांनीं एक काव्यमय पत्र लिहिलें होतें तें खालीं दिलें आहे:—

## माझें मृत्युपत्र.

वैशाखिचा कुमुदनाथ नभांत हांसे ॥
यच्चंद्रिका धवल सौधतलीं विलासे ॥
घाली स्वयें जल जिला प्रिय बाल खासे ॥
जाई फुलें चिमुकलीं नटली सुवासें ॥ १ ॥

आले घरीं सकल आप्त सहृद् जिवाचें ॥
आनंदमग्न कुल गोकुल काय साचें ॥
आदर्श दीप्ति--शुचिता--धृति--यौवनांचें ॥
पाहूनि जें तरुण--मंडल कीर्ति नाचें ॥ २ ॥

प्रेमें हृदें विकसलीं नव यौवनाच्या ॥
गंधें सुवासित उदात्त सुसंस्कृतीच्या ॥
दिव्यालता तरुसि जें गृह बाग झाला ॥
ज्या पौर हर्षित वदे जन ‘ धर्म--शाला ’ ॥ ३ ॥

स्वैंपाक त्वां निजकरें कुशले करावा ॥
प्रेमें तुझ्या अधिकची सुरसाल व्हावा ॥
संवाद सर्व मिळुनी करितां नितांत ॥
जेवावयासि बसलों जईं चांदण्यांत ॥ ४ ॥

श्री रामचंद्र वनवास कथारसाला ॥
कीं केंवि देश इटली रिपुमुक्त झाला ॥
तानाजिचा समरधीर तसा पवाडा ॥
गावा चितोरगड वा शनवार वाडा ॥ ५ ॥

झाली कशी प्रियकरा अपुली अनाथा ॥
दुर्दास्यखिन्न शरछिन्न विपन्न माता ॥
शोकें विवंचुनि तिच्या जइं मोचनाचे ॥
केलें अनंत तरुणा उपदेश साचे ॥ ६ ॥

तो काल रम्य, मधुरा प्रिय संगती ती ॥
तें चांदणें, नवकथा--रमणीय रात्री ॥
तें ध्येय दिव्य निजमातृ--विमोचनाचें ॥
तो उग्र निश्चयहि, ते उपदेश साचे ॥ ७ ॥

झाल्या तदा प्रियकरांसह आण भाका ॥
त्या सर्व देवि वहिनी स्मरती तुम्हां कां ? ॥
‘ बाजी प्रभू ठरुं ’ वदे युव संघ सर्व ॥
‘ आम्हीं चितोर युवती ’ युवती सगर्व ॥ ८ ॥
कीं घेतलें व्रत न हें अम्हि अंधतेनें ॥
लब्धप्रकाश इतिहास–निसर्ग–मानें ॥
जें दिव्य दाहक म्हणूनि असावयाचें ॥
बुध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें ॥ ९ ॥

२

ज्या होति तैं प्रिय जनांसह आणभाका ॥
त्यांतें स्मरोनि मग सांप्रत हें विलोका ॥
नाहीं पुरीं उलटलीं जरि आठ वर्षें ॥
तों कार्यसिद्धि इतुकी मन कां न हर्षे ? ॥ १० ॥
आसेतुपर्वत उचंबळला स्वदेश ॥
वीराकृती धरित टाकुनि दीनवेष ॥
भक्तांचिया रघुपदीं झुलताति झुंडी ॥
जाज्वल्य होयाहि हुताशन यज्ञकुंडीं ॥ ११ ॥
तो यज्ञ सिद्ध करण्यास्तव उग्र दीक्षा ॥
जे घेति येइ तइं तत्कृतिची परीक्षा ॥
“विश्वाचिया अखिल मंगलधारणाला ॥
बोला असे कवण भक्ष्य हुताशनाला ” ॥ १२ ॥
आमंत्रण प्रभु रघूत्तम सोडितां हें ॥
दिव्यार्थ, देव ! आमुचें कुल सज्ज आहे ॥
हे साध्वि ! गर्जुनि असे पहिल्या हवीचा ॥
हा ईश्वरीं मिळविला अम्हि मान साचा ॥ १३ ॥

धर्मार्थ देह वदलों ठरलें नितांत ॥
ते बोल-फोल नचि बालिश बायकांत ॥
ना भंगली भिउनिया धृति यातनांनां ॥
निष्काम--कर्मरति योगहि खंडिला ना ॥ १४ ॥
ज्या होति तैं प्रियजनांसह आणभाका ॥
केल्याचि सत्य कृतिनें अजि ह्या विलोका ॥
दीप्तानलांत निजमातृ--विमोचनार्थ ॥
ह्या स्वार्थ जाळुनि अम्हीं ठरलों कृतार्थ ॥ १५ ॥

३

हे मातृभूमि तुजला मन वाहियेलें ॥
वक्तृत्व--वाग्विभवही तुज अर्पियेलें ॥
तूंतेंचि अर्पिलि नवी कविता वधूला ॥
लेखांप्रती विषय तूंचि अनन्य झाला ॥ १६ ॥
त्वत्स्थंडिलीं ढकलिलें प्रिय मित्रसंघा ॥
केलें स्वयें दहन यौवन--देह--भोगा ॥
त्वत्कार्य नैतिक सुसंमत सर्व देवां ॥
तत्सेवनींच गमली रघुवीरसेवा ॥ १७ ॥
त्वत्स्थंडिलीं ढकलिली गृह वित्त सत्ता ॥
दावानलांत वहिनी नवपुत्रकांता ॥
त्वत्स्थंडिलीं अतुल--धैर्य वरिष्ठ बंधु ॥
केला हवी परम कारुण पुण्यसिंधु ॥ १८ ॥
त्वत्स्थंडिलावरि बळी प्रिय बाळ झाला ॥
त्वत्स्थंडिलीं बघ अतां मम देह ठेला ॥
हें काय बंधु असतों जरि सात आम्हीं ॥
त्वत्स्थंडिलींच असते दिधले बळी मी ॥ १९ ॥

संतान या भरतभूमिस तीस कोटी ॥
जे मातृभक्ति--रत--सज्जन धन्य होती ॥
हें आपुलें कुलहि त्यामधिं ईश्वरांश ॥
निर्वंश होउनि ठरेल अखंड वंश ॥ २० ॥

४

कीं तें ठरोहि अथवा न ठरो परंतु ॥
हे मातृभू अम्हि असो परिपूर्ण हेतू ॥
दीप्तानलांत निजमातृविमोचनार्थ ॥
हा स्वार्थ जाळुनि अम्हीं ठरलों कृतार्थ ॥ २१ ॥
ऐसें विवंचुनि अहो वहिनी ! व्रतातें ॥
पाळोनि वर्धन करा कुल दिव्यतेतें ॥
श्रीपार्वती तप करी हिमपर्वतीं ती ॥
कीं विस्तवांत हंसल्या बहुराजपूती ॥ २२ ॥
तें भारतीय--ललना--बल--तेज कांहीं ॥
अद्यापि या भरतभूमित लुप्त नाहीं ॥
हें सिद्ध होइल असेंच उदार उग्र ॥
वीरांगने ! तव सुवर्तन हो समग्र ॥ २३ ॥
माझा निरोप तुज येथुनि हाच देवी ॥
हा वत्स वत्सल तुझ्या पदिं शीर्ष ठेवी ॥
सप्रेम अर्पण असो प्रणती तुम्हांतें ॥
आलिंगन प्रियकरा मम अंगनेतें ॥ २४ ॥
कीं घेतलें न व्रत हें अम्हीं अंधतेनें ॥
लब्धप्रकाश--इतिहास--निसर्गमानें ॥
जें दिव्य दाहक म्हणोनि असावयाचें ॥
बुध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें ॥ २५ ॥

* * * * *

हिंदुस्थानांत सावरकरांना आणण्याचा हुकूम सुटला पण तो अजून कृतींत उतरावयाचा होता. नेहमींचा मार्ग म्हणजे इंग्लिश खाडींतून फ्रान्स-मधून जावयाचें पण सावरकरांना हिंदुस्थानांत नेणें हें कांहीं निर्विघ्नपणें पार पडणार नाहीं असा पोलिसांना प्रथमपासूनच संशय असल्यानें त्यांनीं फ्रान्सचा मार्ग पूर्णपणें टाळण्याचें ठरविलें. इकडे फ्रान्समध्येंही हिंदी पुढारी सावरकर फ्रान्समध्यें शिरतांच फ्रेंच कोर्टांत बलात्काराच्या बंदीचा दावा इंग्लिश पोलिसावर आणण्यास टपलेलेच होते. म्हणून इंग्लंडमधून निघून कोणत्याही अन्य राष्ट्रीय बंदरास न लागतां थेट हिंदुस्थानास न्यावें असे बेत करून इंडियन व इंग्लिश पोलिसचे नामांकित आफिसर धाडून मोठ्या कडेकोट बंदोबस्तानें सावरकरांस घेऊन बिस्केच्या आखातानें गलबत हाकारण्यांत आलें.

* * * * *

त्यावेळेस दोनच विचार सावरकरांच्या डोक्यांत घोळत होते. एक तर आपणांला पकडण्यांत पोलिसनें व सरकारनें मोठी चतुराई केली ही त्यांची पोकळ घमेंड तोडून त्यांच्या या सर्व बंदोबस्तास धूळ चारून शक्य तर स्वपराक्रमानें निसटून पुन्हां कार्य आरंभावें. किंवा तें न साधल्यास निदान असें कांहीं तरी साहस करावें कीं, युरोपच्या सर्व देशांचें लक्ष क्षणभर तरी हिंदुस्थानच्या राजकारणाकडे सादर वेधून जावें. युरोपभर हिंदुस्थान म्हटला म्हणजे बायकांस जिवंत जाळून त्यांस सती म्हणणारा व पोरें जन्म-तांच गंगेंत फेंकून देऊन त्यांस पूज्य समजणारा धर्मवेडा, भोळा व स्वेच्छेनें इंग्रजांच्या गुलामगिरींत राबणारा देश होय. अशी साधारण समज इंग्रजी मिशनऱ्यांनीं व प्रचारकांनीं फैलावल्यामुळें प्रचलित होती. युरोपच्या बायका बोलतां बोलतां झटकन विचारीत "तें असेल! तुम्ही पूर्वी मोठे पंडित असाल पण एक धनगराचें पोर जितक्या शेळ्या हातीं ठेवूं शकत नाहीं,

त्याच्या अनेक पट तुमचीं जिवंत माणसें एक इंग्लिश पोर वळवीत व सांभाळित असतें ना ? तर मग तुम्हीं गुलामगिरीला योग्यच आहांत. तुम्हांत जेव्हां साहस येईल, तुमच्यांतील एकेक स्वातंत्र्यप्रेमी तरुणास सांभाळतां सांभाळतां दहा दहा इंग्रज हात टेकतील तेव्हांच आम्हीं समजूं कीं, इंग्रज तुमच्यावर केवळ बलात्कारानें राज्य करीत आहेत. " त्यावेळेला युरोपांत असलेली ही हिंदी लोकांविषयींची समज घालविण्याकरितां हिंदुस्थानच्या आकांक्षांची व त्याच्या त्या सफल करण्याच्या कठोर निश्चयांची सर्व जगतास सूचना देणें अवश्य होतें असें त्यांस वाटलें असावें.

* * * * *

युरोपांतील त्या वेळेस प्रचलित असलेला हा समज आज पुष्कळ कमी झालेला आहे. आज युरोपांत हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यगामी राष्ट्राकांक्षेस आंतरराष्ट्रीय महत्व आलेलें आहे. देशासाठीं व राष्ट्रासाठीं प्राणदान करणारे मोठमोठे वीर, हुतात्मे व तपस्वी हिंदुस्थानांत आहेत हें सिद्ध करण्याची आज आवश्यकता राहिली नाहीं. आज हिंदुस्थानांतील जे राजकारणी लोक तिकडे काम करीत आहेत, त्यांस बायका हंसून आज तसें विचारूं शकत नाहींत. कारण ज्यांस सांभाळतां सांभाळतां दहा दहा इंग्रजांस नाकीं नव यावे असे कांहीं स्वातंत्र्यप्रेमी तरुण हिंदुस्तानांतही निघाले आहेत. युरोपमध्यें हिंदुस्थानच्या राजकारणाविषयीं वाटत असलेली तुच्छता अथवा तिरस्कार काढून टाकून त्यांस त्याचें महत्व पटवून देणाऱ्या साहसी पुरुषांमध्यें सावरकर हे निस्संशय प्रथम व प्रमुख होत.

* * * * *

या दोन विचारांनीं प्रेरित होऊन ते एकसारखी संधी पहात टपत होते कीं, या यांच्या कडेकोट बंदोबस्तांतूनही आपणांस काय करतां येईल.

त्यांनीं ती संधी साधण्यासाठीं किती कुशलतेनें सर्व व्यूह रचला व पदोपदीं पोलिसाचे चातुर्यास कशी धूळ चारली ती अतिमनोरंजक माहिती इथें विस्तरशः देतां येणें शक्य नाहीं. ती त्यांचे तेच जेव्हां लिहितील तेव्हां कळूं शकेल. इतकें मात्र खरें कीं, बोट मार्सेलिसच्या बंदराकडे जाणार नाहीं हें प्रथम प्रसिद्ध केलें असतांही ती एकाएकीं मार्सेलिसला जाऊं लागली. सावरकरांचे मनांत आशा उदय पावली कीं, न जाणों आपली मंडळी बोटीवर येऊन कांहीं सहाय्य करूं शकतील. पण बोट मार्सेलिसला पोचतांच कोणीही सहाय्यक दिसेना. इतकेंच नव्हे पण त्यांस सोडून पोलिस एक मिनिटभरही दूर होईनात. केवळ स्नानाचे खोलींत त्यांस कोंडीत तेव्हां वा शौचास जातेवेळीं जरा दूर पण दाराशीं खेटूनच उभे राहत. इतकेंच नाहीं पण दाराचे समोर एक मोठा आरसा ठेवून त्यांतून प्रतिबिंबानें आंत काय करीत आहेत हें टक लावून पहात. दोनदां त्यांचें लक्ष्य चुकवून निसटण्याचा प्रयत्न केला. दोनदां फसला. पण दोनदांही तो केला हें एक सावरकरांचें सावरकरांनाच कळलेलें होतें.



# प्रकरण ७ वें.

## बोटीवरून समुद्रांत उड्डाण.

प्रातःकालही झाला नव्हता. बोट सुटण्याचे वेळीं प्रवाशांची ये जा चाललेली होती. दोघेही युरोपियन पोलिस आफिसर निजलेले व एक जागत बसलेला व त्या सर्वांचे मध्यें सांवरकरांस घालून त्या लहान पांच सात पावलांच्या खोलीचें ( क्याबिनचें ) दार लावलेलें. आतां थोडक्या वेळानें बोट सुटणार. जें काय शक्य असेल तें आतांच करतां येईल. पण करतां काय येईल ? हे तर सर्व सावध. तथापि ठरल्याप्रमाणें आणखी एकदां तिसरा प्रयत्न करून पहावा मग जें होईल तें होवो ! सावरकर त्या जागत्या शिपायास म्हणाले, "शौचास चलावें पहाट झाली आहे" पण तो एकटाच चला म्हणण्याचे स्थलीं आपल्या ऑफिसरांस जागें करूं लागला ! सावरकर समजले घात झाला. तरी पुढें पाहूं या. आफिसर व तो शिपाई हे दोघे दोहोंबाजूनें त्यांस मध्यें घालून शौचाचे खोलीकडे गेले. पोलिसांनीं एक रतिमात्रही त्यांचा कडेकोट बंदोबस्त ढिला केलेला नव्हता. शौचाचे खोलीस काचेचें दार. समोर आरसा. सावरकर काय करतात तें दारास लागूनच एकसारखा तो शिपाई पहात हाता. शौचाचे खोलीचे वर मात्र एक पोर्ट होल म्हणजे अगदीं लहान वाटोळी खिडकी होती. व तिचें काचेचें दार थोडें किलकिलें केलेलें होतें. या खिडक्या गलबतावर बहुतेक एकाच आकाराच्या असल्यानें त्यांचें साधारण मोजमाप मोठ्या चातुर्यानें सावरकरांनीं पहिल्यानींच केलेलें होतें. पण त्या खिडकीपर्यंत पोचावें कसें ? आपण थोडे हल्लों तरी समोरचा शिपाई बोंब मारणार मग चढावें कसें ? जर प्रयत्न फसला तर खटल्याचा सर्व रंग आणखी

काळा कुट्ट होणार. पोलिस, यमयातना व मारहाण करण्यास सोडणार नाहींत. मागून गोळ्याही झाडणारच ! पण या सर्व प्रश्नांचा व परिणामांचा विचार त्यांनीं मागेंच केला असल्यानें व आयुष्याची आशा त्यांनीं कधींच सोडली असल्यानें ते आपल्या मनाशीं पण स्पष्टपणें पुटपुटले, " Now or never ! " आतांच ! नाहीं तर पुढें अशक्य !

*            *            *            *            *

झटपट त्यांनीं अंगावरचा सहेतुकच आणलेला लांब गाऊन--अंगरखा-काचेच्या दारावर टाकला. त्या योगें त्या शिपायास किंचित् अंधुक दिसूं लागल्यानें तो मागें पहात आहे तोंच एका उडीसरशीं दोन तीन लांकडें पकडून सावरकर खिडकींत आले. " क्या क्या करता ? " इतकें तो शिपाई ओरडतो व शुद्धीवर येतो न येतो तों अंगांत सहेतुकच प्रथमपासून घातलेल्या तंग गंजिफ्राकचे विजारीसह सावरकर खिडकींत अंग घुसडून सरकूं लागले ! तोंच मागें शिपायानें एकसहा बोंब मारून काचेचें दार लाथ मारून फोडलें. मागें तो घुसतो तों पुढें सावरकर खिडकींतून निसटले. ताड ताड गोळ्यासारखे आवाज, बोंबा, शिव्यांचा कल्लोळ ! सावरकर समुद्रांत उडी घालून गोळी आपल्यास न लागावी म्हणून डुबकी घेऊन पुढें चालले. खिडकीपाशीं शिपाई व अधिकारी आले पण त्यांची छाती उडी घेण्यास होईना-किंबहुना तें अशक्यच होतें. ते परत बोंब घालीत बोटीच्या कप्तानाकडे पळाले. सर्व बोट खडबडून उठली. व डाब्रिज ( फेंका पूला ) वरून तटावर उतरण्यासाठीं लगबग धावूं लागले. त्या संधींत समुद्र पोहून सावरकर तटास लागले. पण पुढें ती उंचच उंच तटाची भिंत आली. आजूबाजूस लोक बोटीवरील बोंबेनें सावध होऊन आडवे आले होते.

*            *            *            *            *

लहानपणीं संस्थेंत शरीरपरिवर्तनाचे जे नियम असत त्यांत एक नियम असे कीं, तटावर चढण्याची प्रत्येकानें संवय करावी ! ती संवय कामास आली. सावरकर तट चढून फ्रान्सच्या भूमीवर उतरले. त्यांचे चित्तांत स्पष्टपणें विचार आला कीं हीच फ्रान्सची भूमि ! मी हिला शिवलों आहें ! मी आतां फ्रान्सच्या रक्षणाखालीं आलों आहें ! माझें अर्धें काम झालें. पुढील अर्ध हो वा न हो !! त्यांनीं एक दीर्घ श्वास घेतला. फारा दिवसांनीं स्वतंत्र वायु मी हुंगीत आहें अशी आठवण त्यांस झाली व तो श्वास त्यांस खरोखरच अत्यंत मधुर लागला ! पण एकच श्वास तो !!

* * * * *

कारण इतक्यांत तिकडे बोटीवरील सारे अधिकारी नौकर व पोलिस धापा टाकीत धांवत ओरडत "चोर धरा ! चोर धरा !" म्हणून आरोळी उठवीत आले. सावरकर तटावर येतांच थकले असतांनांही क्षणभर न थांबतां सरळ बाणासारखे पुढें घुसले. धांवतां धांवतां पुन्हां पुन्हां वळून मागें पहात तों इंग्रज चहूंकडून कोंडीत येत आहेत. आजूबाजूस पुन्हा पुन्हा पहात कीं, चुकुन एखादा जरी हिंदी मनुष्य इथें दिसेल तरी त्याचेकडून प्यारिसला व फ्रेंच म्याजिस्ट्रेटला तार देववीन व या फ्रान्सच्या कायद्याचे विरुद्ध चाललेल्या व मला धरून तुरुंगांत टाकणाऱ्या इंग्लिश पोलिसांसच धरून तुरुंगांत टाकवीन ! पण कोणी स्वजन दिसेना ! स्वजन, स्वदेश तर दहाहजार मैलावर राहिले पण स्वराज्याचे कल्याणासाठीं विदेशांत मृगया होत असलेल्या ह्या एकाकी पंचवीस वर्षांच्या तरुणास कोणी एखादा पैसा जरी देईल तरी त्या उभ्या आडव्या धावणाऱ्या ट्राममध्यें बुडी घेऊन तो कोठल्याकोठें निघून जाऊन मृत्यूच्या दाढेंतून सुटेल. आतां त्याचें जीवन वा मरण एका पैशावर अवलंबून आहे !

* * * * *

पण एक पैसाही कोठून मिळणार ! पण तो तरुणही हात पाय गाळणारा नव्हता ! फ्रेंच पोलिस ! फ्रेंच पोलिस म्हणून हांक मारीत तो एकसारखा पुढें धावत होता. मागें व आजूबाजूनीं चोर ! चोर ! म्हणून खोटाच आरोप उठवीत ते पांच पन्नास माणसांचें लटांबर धांवत येत होतें. पण त्यास धरूं शकत नव्हतें. आतां तर मागच्याच्या ओरडीनीं उत्तेजित फ्रेंच मार्गस्थलोक पुढूनही आडवे झाले. पण आट्यापाट्याप्रमाणें हुलकावण्या दाखवीत तो हिंदी तरुण तसाच पुढें धांवत निसटत सगळ्यांस चकवीत चाललाच होता. इतक्यांत बाजूस एक फ्रेंच पोलिस दिसला ! बस्स या स्थलीं या पोलिसाचे हातीं स्वेच्छेनें जाऊन त्यास सांगावें कीं, फ्रेंच म्याजिस्ट्रेटकडे घेऊन चल तिथें मी चोर नसून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यार्थ इंग्लंडशीं झुंजत असल्यानें धरला गेलेला एक इंग्लंडचा राजकीय बंदी आहे व फ्रान्सचा एक स्वतंत्र व निर्दोष अभ्यागत आहें ! असले परिस्थितींत हेंच सर्वोत्तम ! असें योजून ते उभे राहिले. फ्रेंच पोलिस आला. पण त्याचे मागोमाग चहूंकडचा तो पाठलाग करणाऱ्या इंग्रजांचा घोळकाही आला. त्यांनीं त्या फ्रेंच पोलिसास आधींच मथवून ठेवलेलें होतें. ते आंगावर मोठमोठ्या जरीच्या फिती लावलेले बलाढ्य इंग्रज सरकारचे अधिकारी ते सांगतात कीं हा चोर आहे ! हें एक मिसूर न फुटलेलें, अंगांत एक गंजीफ्राकची तुमान असलेलें, धुळीनें भरलेलें व एका पददलित हिंदुस्थान नांवाच्या कुलीच्या देशांतलें कोणातरी कुलीचें भिकारी मूल--हें चोर असलेंच पाहिजे ! त्यांनीं सावरकराचा हात बळकट धरला. सावरकरांनीं पुन्हां बजावलें कीं, मी चोर असलों तरी तुला फ्रेंच कोर्टात नेल्याविना मला दुसऱ्या कोणाच्याही हातीं देतां येत नाहीं ! पण तो एक यःकश्चित फ्रेंच पोलिस कायद्याच्या शब्दांशीं असलेल्या परिचयापेक्षां सोन्याच्या गिन्यांशीं असलेला त्याचा परिचय व त्याचा लोभ हा केव्हांही अधिक असणारच ! तो त्या द्रव्याच्या तेजानें दिपला, चमकला व मागेंपुढें करूं

लागला. तोंच त्याची पुढें वाट न पाहतां इंग्रजांनीं सावरकरांना धरून ओढीत, ताणीत, ढकलीत बलात्कारानें स्टीमरवर चढविलें ! ते त्या बलात्काराचा प्रतिनाद करीत होते ! !

* * * * *

ती रात्र भयंकर होती ! त्या एवढ्याशा क्याबिनींत सर्व पोलिस कोंबून उभे होते. बसावयास जागा नव्हती. दारावर एक नागवी तरवार टांगत ठेवलेली. कोणी ब्र काढील तर शपथ. आजुबाजूच्या सर्व क्याबिनी सोडून गलबताच्या सर्व भागांत सुखवस्तू प्रवासी चाललेले. तो भागच रिकामा केला कारण ? पोलिस आपसांत सहेतुक त्या तरुण बंदीस ऐकूं जावें अशा ध्वनीनें म्हणत " आज रातको सालेको बताएंगे ! " तर काय आज रात्रीं नाशिकला जो छळ झाला म्हणून आपण वाचलें तसलाच छळ होणार काय ? आज मला तोंडांत बोळा देऊन हे मारहाण व छळ करणार ? ठीक ! हें तर आम्हांस त्याच दिवशीं कळलें होतें कीं ज्या दिवशीं आम्हीं हें राष्ट्रोद्धाराचें व्रत उचललें होतें.

* * * * *

पण ह्या इतक्या साहसाचा काय परिणाम झाला ! सुटका म्हणावी तर झाली नाहीं. उलट पायांतील बेड्या अधिकच जड व कांटेरी झाल्या ! बरें दुसरा उद्देश कीं युरोपमध्यें आपल्या कष्टानें हिंदुस्थानच्या आकांक्षांची व राजकीय साहसाची व स्वातंत्र्य संपादनाच्या कठोर प्रतिज्ञेची प्रसिद्धी ( जाहिराती ) व्हावी तर तेंही फसलें कारण मार्सेलिसला आपण निसटलों ही बातमी जगांत चिटपाखराला सुद्धां कळणार नाहीं ! कोण कळवणार ! तथापि कर्मण्येवाधिकारस्ते ! कर्मण्येवाधिकारस्ते ! !

* * * * *

रात्र झाली. प्रतिक्षणीं सावरकर बघत होते कीं हे मारहाणीस केव्हां आरंभ करतात. थोड्याच वेळांत त्यांचा मुख्य इंग्लिश ऑफिसर अगदीं निरखून निजलेल्या सावरकरास न्याहाळीत उभा राहिला. व शेवटीं म्हणाला "क्या अवलाद है!" सावरकरांना डोळे उघडले. तेव्हां तो म्हणाला, "तुला शरम वाटत नाहीं!" सावरकर कांहीं उत्तरले नाहींत. तेव्हां आणखी चढून जाऊन इंग्लिशमधल्या दोन निवडक शिव्या हांसडल्या व आंगावर आलेसारखे करून हातवारे करीत म्हणाला, 'कीं काय करूं? मी त्यावेळेस जागा नव्हतों नाहीं तर तुझ्या.........! हे अपशब्द ऐकतांच सावरकर उठून बसले व त्या आफिसरास गंभीर स्वरांत म्हणाले "हें पहा! मी ज्यावेळेस ज्याला तुम्ही बंड म्हणतां तें उभारलें तेव्हां मी आपल्या घरास प्रथम आग लावून दिली व नंतर इतरांचीं घरें जाळावयास निघालों. मी जिवंतपणींच आतां मेलेला आहें. नंगा निर्भयपणा हा माझा एकच मित्र आहे. पण तुम्ही? तुम्हांस बायकामुलें आहेत. तुम्हांस अजून जगावयाचें आहे. तेव्हां हें ध्यानांत धरा कीं, जर तुम्ही मला असे अपशब्द बोलाल, जर मारहाण कराल तर मी तर मरेनच पण तुम्हांपैकीं कोणा एकास घेऊन मरेन!" सावरकरांचे हे शब्द फोल नव्हते. त्या रात्रीं ज्या तुमानीच्या खिशांत तो पिस्तुल भरून ठेवी ती तुमान सहज विसरून वरच्याच खुंटीवर होती. सावरकरांनीं योजून ठेविलें होतें कीं, जर कदाचित मारहाण करूं लागले तर शक्य तर झटपट करून त्या तुमानींतलें तें पिस्तुल घ्यावयाचें व शक्य तर त्याचा निदानीं आपलाही अंत करून टाकावयाचा!!

* * * * *

ते तशा भयंकर दृढतेचे व नंग्या निर्भयतेचे शब्द व्यर्थ गेले नाहींत. एकाएकीं तो अधिकारी नरम झाला, व कळवळून म्हणाला "मी शिवी बिवी कांहींएक देणार नाहीं. तुम्हींही असा कांहींही अविचार करूं नये. हें पहा मी तुम्हांस किती सभ्यपणानें वागविलें. पण तुम्ही माझ्यावर पेच

मारून माझे बायकापोरांचे तोंडची भाकर काढून घेतलीत. म्हणून कांहीं शब्द रागांत माझे मुखांतून निघून गेले" सावरकर म्हणाले, "तुम्ही म्हणतां तें एक प्रकारें खरें आहे. पण हें पहा, तुम्हांला बायकापोरें आहेत. तशीं मलाही नाहींत काय ? मग जेव्हां हें वारंट घेऊन तुम्ही मला पकडलेंत व इतक्या बंदोबस्तानें व कठोर कौशल्यानें पहारा देत फांशीचे खांबाकडे चालविलेंत तेव्हां माझ्या बायकापोरांचें काय होईल याचा विचार तुम्हीं केला होतात काय ? तुम्ही सभ्यपणानें वागतां तर मीही कांहीं असभ्यपणानें नागवा नाचत नाहीं. मीही सभ्य व गोड भाषेंतच बोलतों. पण आपली माझी ज्या परिस्थितींत गांठ पडली आहे त्या परिस्थितीचाच हा दोष आहे. तींत तुम्ही मला स्वतंत्र वावरूं न देतां जोंवर बांधून—करकचून बांधून—फांशीकडे नेता आहांत तोंवर शक्य तर तुमच्या हातांतून सुटून जाण्याचा मीही प्रयत्न करणारच. तेव्हां याविषयीं कोणी कोणावर जळण्यांत अर्थ नाहीं. जर तुम्हास मला ठार मारावें हें कर्तव्य वाटतें, तर मला तुमचे हेतू निष्फळ करावे हें कर्तव्य वाटणारच.

* * * * *

झालें. मारहाणीच्या रंगांत एकसहा फरक झाला. ती तरवार अदृश्य झाली. पोलिसांची आपसांतील भाषणांत चालणारी शिवीगाळ ऐकूं येईनाशी झाली. मात्र बाकी बंदोबस्त इतका झाला कीं, श्वासोश्वास करणें कठीण वाटूं लागलें. लहान क्याबिनमध्यें सदा राहाणें व तेंही दोन विपक्षी माणसांसह. तेथेंच जेवण, तेथेंच लघ्वी, इतकेंच काय परसाकडेसही हातकडीसुद्धां एका मनुष्याच्या हातांत हात घालून बसणें. हातकडी जेवतांनाही अर्धीच निघे. सूर्यप्रकाश बघावयास मिळेना मग सूर्य दूरच ! डॉक्टरला अर्ज केल्यानंतर क्याबिनचे समोर आठ नऊ पाऊलें उजेडांत चालावयाची अनुज्ञा मिळाली ! ही बाह्य परिस्थिती आणि मनःस्थिती त्याहून ही भयंकर ! आतां पुन्हां सुटकेची संधी सांपडणें पुन्हां किती—अशक्य आतां हिंदुस्था-

नांत जिवंत जाऊन विजेत्याच्या रथाच्या चाकाला बांधले जाऊन त्याच्या जयोत्सवास शोभा आणण्यापेक्षां आतां येथल्या येथें हा समुद्र उचंबळून माझ्या एकट्याच्या क्याबिनमध्यें शिरून मला अलगज नेऊन बुडवून टाकील तर किती उत्तम ! आत्महत्येचें जें कार्य धर्म करूं देत नाहीं ती प्रकृति येऊन स्वयंमेव करो ! पूर्वी सागरास विनंति केली होती.

ने मजशीं ने परत मातृभूमीला ! सागरा प्राण तळमळला ॥ व त्यानेंही ती ऐकली पण अशी ऐकिली कीं, तें वरदान शापाहून भयंकर व्हावें ! आतां मातृभूमीला परत ने म्हणून नव्हे तरः—

" दे साक्ष सिंधु ! ज्या काळा रे !  
वाहसी मज तमःपुरिला ( त्या )  
प्रत्येक तुझ्या कल्लोळा ( तै )  
विनविलें न कां । उघडुनि मुखा ।  
ज्या घेऊं न दे धर्म दे तया मरणा ॥





व  
ल्या

# प्रकरण ७ वें.

## जन्मभूमींत आगमन पण दोन जन्मठेपींची शिक्षा

आतां मातृभूमीस पाय लागला पण तो सशस्त्र नागव्या तरवारी घेऊन शिडीच्या पायरीपायरीवर उभ्या राहिलेल्या गोऱ्या सैनिकांचे रांगेतून ! मुंबईहून त्वरित त्यांस नाशिकला स्पेशल ट्रेननें नेण्यांत आलें. डब्यांचे, मोटारीचे, घराचे सर्व दरवाजे बंद ! बरोबर एक धिप्पाड आफिसर होता त्याचे हातांत एक हातकडी व तिची दुसरी कडी सावरकराचे हातांत अडकविलेली. लघवीस व शौचास देखील त्याचेबरोबर त्याच स्थितींत जाणें ! नाशिकला येतांच त्यांस काढणी घालून म्हणजे दंडामागें दोऱ्या बांधून त्या बैलाच्या वेसणीप्रमाणें धरून हातांत हातकडी व पायांत बेड्या ठोकून पोलिसाचे चौकीपुढील मार्गावर फिरविण्यांत आलें. पण इतक्या सर्व खटाटोपामधूनही छिद्र पाडून सावरकरांचे हातांत एक इंग्लिश पत्र पडलें. त्यांत तार होती कीं, फ्रान्सनें सावरकरांस परत देण्याविषयीं इंग्लंडकडे मागणी केली आहे ! व जगभर त्याविषयाची चर्चा चालली आहे ! ! !

* * * * *

तर मग मार्सेलिसचें साहस पूर्णपणें वायां गेलें नाहीं. एक उद्दिष्ट तर सफळ झालें कीं, युरोपभर हिंदुस्थानच्या आकांक्षेचा दुंदुभी वाजूं लागली. डेली न्यूज व तत्सम इंग्रजी पत्रांनीं स्वतःच लिहिलें कीं, इटलींतील राज्यक्रांति-रक म्याझिनी व ग्यॉरीबाल्डी ह्यांच्यावरील आरोपास न जुमानतां इंग्लंडनें त आश्रयस्थान दिलें तर ते त्याच्याचप्रमाणें स्वदेशस्वातंत्र्यार्थ झगड- सावरकरांसही फ्रान्समधें कां मिळूं नये ! यूरोप, अमेरिका, चीन, यन व आयरिश पत्रांत तर सावरकर यांची तुलना म्याझिनी, कोसूथ

ग्यारीबाल्डी यांच्याशीं उघड उघड करण्यांत येऊं लागली व त्याबरोबरच हिंदी स्वराज्याच्या चळवळीसही महत्त्व प्राप्त होऊन तिच्याकडे जगाचें लक्ष कधींच वेधलें नव्हतें असें वेधूं लागलें. डेली न्यूजचा वरील कट (cuttings) व इतर कांहीं युरोपीय पत्रांचे उतारे सावरकर यांस नाशिककडून येरोड्यास आणतांना मिळाले. तेव्हां क्षणभर चित्तास आनंद झाला. पण तोंच मनांत वाटलें कीं, पराजयाचें दुःख टाळण्यास मी कर्मण्येवाधिकारस्ते या वचनानें समाधान करून घेतलें होतें, जर कर्मण्येवाधिकारस्ते या तत्त्वानें निष्फळतेच्या दुःखास तुझा अधिकार नाहीं तर आज अंशिक सफलतेच्या आनंदावरही तुझा काय हक्क ?

* * * * *

मार्सेलिसला घडलेली हकीकत कशी काय बाहेर फुटली याविषयीं इंग्रजी अधिकाऱ्यांना अत्यंत आश्चर्य वाटलें. त्यांनीं इतर माहिती मिळविण्यासाठीं जसा सावरकरांपाठीमागें ससेमिरा लावला तसाच मार्सेलिसहून प्यारिसला तुम्ही पळाल्याची तार कोणी केली याविषयींही विचारून थकविलें. कोणी कां होईना पण मार्सेलिसला सावरकरांस पकडल्याची तार प्यारिसला देतांच प्रथमतः तो विषय "ला ह्युमॅनिटी" या नांवाच्या पत्रानें हातीं घेतला--हें पत्र जगांतील कम्युनिस्ट सोशियालिस्टांचें जें बायबल समजलें जातें त्या 'क्यापिटल' या नांवाच्या अर्थशास्त्रीय ग्रंथाचा कर्ता कार्ल मार्क्स या प्रख्यात पुरुषाचा नातू चालवीत असे. त्यांत सावरकरांविषयीं नेहमींच आदर वाटत असल्यानें त्यांच्या वर्चस्वी पत्रानें तो विषय सारखा उचलून धरला. फ्रेंच सिनेटमध्यें खळबळ आरंभली गेली. इंग्लंडचें व फ्रान्सचें या विषयावर वितुष्ट पडतें कीं काय असा धाक पडतांच अंतीं तें सर्व प्रकरण आंतरराष्ट्रीय न्यायालयाच्या पंचासमोर हेगला सोंपविण्यांत आलें. सर्व प्रमुख राष्ट्रांतील लोकांचें लक्ष त्या कोर्टांत काय निकाल होतो तिकडे लागून त्यांचे प्रतिनिधीही तेथें आले होते. तेथें हिंदी क्रांतिकारकही जमले व आलेल्या

अनेक राष्ट्रांच्या पुढाऱ्यांच्या गांठी घेत हिंदुस्थानचे स्वातंत्र्याचा प्रश्न व स्वदेशाच्या चाललेल्या छळांचा व दुर्दशेचा पाठ वाचीत होते. अशा रीतीनें जगाच्या अत्युच्च न्यायासनासमोर आंतरराष्ट्रीय प्रश्न म्हणून सर्व प्रमुख देशचे प्रतिनिधी या एका हिंदी तरुणांस कोठें ठेवावें या प्रश्नाचा खल करीत होते. जगाच्या अत्युच्च आंतरराष्ट्रीय न्यायालयांत हिंदुस्थानचा राजकीय निर्देश व प्रवेश प्रथमतः सावरकरांच्या साहसानेंच झाला.

* * * * *

इकडे हिंदुस्थानांतही त्याचे आधींच असे खटले चालविण्यासाठीं व त्याचा झटकाफटकीं निकाल देण्यासाठीं एक 'स्पेशल ट्रिब्युनल' नांवाचा कायदा पास करावा लागला. या कायद्यान्वयें ज्यूरिविना, अपिलाविना सरकार नेमील त्या तीन जज्जांना कटवाल्यांस मरणापर्यंत शिक्षा देण्याचा हक्क दिलेला होता.

* * * * *

इतकी कडेकोट सिद्धता केली व इंग्लंड, फ्रान्स व हिंदुस्थानचे पोलिसास सळो का पळो झालें. जगांतील मोठमोठ्या न्यायाधीशापर्यंत व जगांतील अत्युच्च कोर्टापर्यंत भांडत बसतां बसतां हिंदुस्थानसरकारचे व विलायत-सरकारचे नाकीं--नव आले, नवे नवे कायदे केले, लाखों रुपये उधळले तेव्हां कोठें हा पंचवीस वर्षांचा एक मराठा क्रांतिकारक, सरकारास कोठडींत नेऊन कोंबतां आला.

फार दिवस गाजत असलेला नाशिकच्या कटाचा खटला, कीं ज्यांत सावरकर हे मुख्य आरोपी आहेत व म्हणूनच ज्याकडे जगांतील सर्व राष्ट्रें उत्सुकतेनें पहात आहेत तो आज मुंबई हायकोर्टांत आरंभला. जिकडे तिकडे सशस्त्र घोडेस्वारांचा थयथयाट चाललेला होता. कोर्टांत कटाचे इतर आरोपी आणून बसविले. त्यांच्यांत केवळ सावरकरांशीं संबंध असल्यानेंच कित्येक या संकटांत सांपडले होते. त्यांतील प्रत्येकाच्या पोलीस

कानीं कपाळीं ओरडत होते कीं तुमचा नाश या नष्ट सावरकरांचे पायीं झाला. अजून तरी त्या चांडाळाचें नांव काढणें सोडून द्या व त्याचे विरुद्ध काय माहीत असेल तें सांगून मोकळे व्हा! कोर्टांत केवळ निवडक वकील मंडळ सोडून चिटपाखरूंही फडकूं दिलें नव्हतें. बाहेर मार्गीमार्गांनीं उघडपणें जमणें अशक्य असल्यानें थव्याथव्यांनीं, खिडक्या खिडक्यांतून, घरांदारांतून लोक सावरकरांच्या येण्याची मार्गप्रतीक्षा करीत होते. तोंच अत्यंत कडे-कोट बंदोबस्तांत मागेंपुढें सशस्त्र घोडेस्वारांचे पहाऱ्यांत सावरकरांची गाडी कोर्टापुढें आली. त्यांस हातकडी* ठोकून दोघांनीं धरून वर नेलें. कोर्टाचे बंगल्यांत पाय टाकतांच नीट आरोपी लोकांच्या डांकमध्यें नेलें. तों एकसहा टाळ्यांचा कडकडाट झाला! सावरकर दचकून वर पहातात तों ग्यालरींत तर कोणी नाहीं! खालीं पहातात तों सर्व आरोपींचीं वदनें मागें मुरडलेलीं, दृष्टि आपल्याकडे अत्यंत उत्सुक आदरानें लागलेली! तर मग ह्यांनीं टाळ्यांनीं माझें स्वागत केलें!!

* * * * *

जेव्हां स्वतःचे गळ्यांत फुलांच्या माळा पडत होत्या व हजारों लोक जयजयकार करीत दूध बत्तासे व मिठाई पुरस्कार देत लोटत होते तेव्हां अनेक अनुयायांनीं माझें भक्तिपुरःसर टाळ्यांनीं स्वागत केलेलें होतें. पण तें सहाजिक होतें. आज माझे हातांत हातकड्या असतांनां, माझे शब्दावर विश्वास ठेवल्यानें व माझ्याशीं संबंध राखल्यानें ज्यांचे हातांत बेड्या पडल्या, ज्यांच्या घरादारांची राखरांगोळी झाली व ज्यांना मजहूनही अघोर शरीर-छळ सोसावा लागला त्यांनीं आज माझें जें हें स्वागत केलें तें मात्र असा-हाजिक, असाधारण होय! जगांत पुष्कळ मान मिळतात. शहरांतून हजारों लोकांचे थवे मिरवितात, पण जेव्हां हातकड्या पडलेल्यांचे स्वागतार्थ त्यांच्यासाठींच हातकड्या पडलेले लोक त्या बद्ध हातांनींच टाळ्या वाज-वितात तेव्हां त्या क्षीणध्वनींत जो सन्मान असतो तो सत्कार मात्र धन्य होय!

* * * * *

खटल्याचा वृत्तांत तर राहोच पण त्यांतील अनेक विनोदी, उत्साही, करुणामय, भयंकर, महत्वपूर्ण व गंभीरतम असे निवडक प्रसंगही सांगणें स्थलाभावामुळें अशक्य आहे. इतकेंच सांगितलें पाहिजे कीं, सावरकरांनीं ब्रिटिश कोर्टाचा आपल्यावर अधिकार चालूं शकत नाहीं व म्हणून मी कोर्टांत भाग घेत नाहीं म्हणून कळविलें. १२१ च्या भयंकर अपराधाविषयीं चौकशी असतांही धिःकारपूर्वक ब्रिटिश न्यायकोर्टाचा अधिकार न जुमानणारा हा हिंदुस्थानांतील पहिलाच आरोपी होय.

* * * * *

आजची मिती १९१० च्या डिसेंबरची तारीख २३. आज कोर्ट दीड दोन महिने अव्याहत चालत असलेल्या ह्या असाधारण खटल्यांचा निर्णय सांगणार! आरोपींमध्यें चर्चा चाललेली आहे. कोणास काय पारितोषिक मिळणार? ज्यांस जितकीं वर्षें काळेंपाणी मिळेल म्हणून सावरकर तर्क सांगत होते त्यांचे त्याप्रमाणें विनोदांत क्रमांक ( नंबर ) लागत होते. जो सगळ्यांत जास्ती शिक्षेस पात्र होण्याचा संभव त्याचा पहिला क्रमांक. त्याहून कमी त्याचा दुसरा--तिसरा--चवथा आजपर्यंत " धर्मार्थ देह वदलों " त्याची आज परीक्षा आहे. बघूं कोण कोण उतरतें म्हणून परस्पर विनोद चालला आहे इतक्यांत जज्ज आल्याची गंभीर सूचना झाली. लांबलचक निर्णयपत्र वाचून अखेर तीनही भयंकर अपराध सिद्ध झाल्याचें जज्जांनीं सावरकरांस हांक मारून सांगितलें " तुम्हाला फांशीच व्हावयाची पण आम्ही आजन्म काळेपाण्याची शिक्षा सांगतों ! ! " सावरकर अर्धे उठले, नतशीर्ष करून गंभीर स्वरानें त्या शिक्षेचा स्वीकार करीत म्हणाले " वंदे मातरम् !"

* * * * *

एकामागें एकास पुकारून भयंकर शिक्षांची खिरापत वाटली जात आहे. खटल्यांतील अनेक आरोपांपैकीं त्या लोकांवर एक आरोप हाही होता कीं, ते नेहमीं " स्वातंत्र्य लक्ष्मी " चा जयजयकार करीत वास्तविक. सर्व आरोप

एकाच आरोपांचीं रूपांतरें--परिणाम होते म्हटलें तरी चालेल. सर्वांस १४ वर्षें १० वर्षें ३ वर्षें इत्यादि कठोर शिक्षा कठोरपणें सांगून निकाल संपविला. जज्ज मोठ्या समारंभानें अखेर यांची खोड मोडली असें समजून परत जावयास निघाले; तोंच हे कठोर शिक्षा झालेले सर्व तरुण एकसहा उभे राहिले व त्याच शब्दांत गर्जून उठले " स्वातंत्र्य लक्ष्मीकी जय ! " " श्री स्वातंत्र्य लक्ष्मी की जय ! "

* * * * *

जज्ज चपापले. परत फिरले. पोलिसांचे अधिकारी चहूंकडून धांवले. त्यांचा मुख्य चवताळून ओरडूं लागला, " अब कैदी है, बेतसे मारो ! ! " प्रथम सावरकरांस धरून खालीं नेण्यांत आलें. जातांना टोपी काढून, दुरून त्यांनीं मागें राहिलेल्या स्वजनांस, सहकाऱ्यांस व आपल्या लहान भावास कीं, ज्यालाहि शिक्षा लागली होती त्याला प्रेमानें व दुःखानें निरोप देत पुढें ओढणाऱ्या पोलिसांमागून गेले. " आतां पुन्हां या स्वजनांस, या धाकट्या भावास या जगास—मी कसा भेटणार ! ! " असा विचार त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्टपणें उमटला होता !

* * * * *

परंतु जन्मठेपीच्या एका शिक्षेनें सरकारचें समाधान झालें नाहीं. त्याच पुराव्यावर परंतु निराळ्या कलमाखालीं खुनास चिथावणी व सहाय्य केल्याच्या आरोपावरून सावरकरांवर लगेच दुसरा खटला भरण्यांत आला. ही बातमी ऐकतांच बहुतेकांस असें वाटणें साहजिक होतें कीं, बहुधा पहिल्या खटल्यांत सावरकरांस फांशीची शिक्षा झाली नाहीं म्हणून दुसरा खटला भरला असावा. आतां यांतही जर त्यांनीं भाग घेतला नाहीं व आपला बचाव केला नाहीं तर त्यांस फांशी होणारच होणार ! कित्येकांनीं तर निनांवी तारा धाडून सावरकरांस कळविलें कीं, आपण खटल्यांत भाग घेऊन आतां तरी बचाव करावा. परंतु हेग कान्फरन्समधील निर्णय लागला नसल्यानें सावरकरांनीं पुन्हांही भाग घेण्याचें व खटल्यांत बचाव करण्याचें नाकारलें. सर्व एकपक्षी चवकशी

झाली. निर्णयाच्या दिवशीं फांशीची शिक्षा ऐकण्याच्या सिद्धतेनें सावरकर कोर्टांत गेले. बहुतेक पोलिसांचीही अटकळ तीच होती.

* * * * *

पण काय झालें असेल तें असो; न्यायाधिशांनीं पुन्हां आणखी जन्मठेपीची शिक्षाच दिली पण फांशी नाहीं? क्वचित् मार्सेलिसच्या साहसाचे हे उपकार असावेत. क्वचित् ५० वर्षांच्या जन्मठेपीची अघोर शिक्षा फांशीहूनही कांहीं अंशीं असह्यतर असल्यानेंही फांशी अनवश्यक दिसली असावी. निदान सावकरांस तरी ५० वर्षे शिक्षा ऐकतांच फांशीप्रमाणेंच ती भयंकर वाटली. पण "बुध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें!!', ही दुसरी शिक्षा होतांच ते शांतपणें उठून गंभीर स्वरांत म्हणाले:—"I am prepared to face ungrudgingly the extrem penall of your laws in the belief that it is through suffering and sacrifice alone that our beloved motherland can march on to an assured, if not a speedy, triumph!"

* * * * *

"तप आणि बलिदान ह्यांच्या योगानेंच आपली प्रिय मातृभूमि द्रुत नसली तरी निश्चित विजय अंतीं वरणारी आहे हीच माझी निष्ठा असल्यानें मी तुमच्या कायद्यांतील या अत्यंत कठोर शिक्षेलाहि तोंड देण्यास सज्जच आहें."

* * * * *

तथापि हेग कान्फरन्समधील खटला फ्रान्स जिंकून सावरकरांस सोडवून नेईल अशी अजून पुष्कळांस आशा होती सावरकरांस मात्र अगदीं नव्हतीच म्हटलें तरी चालेल! मार्च १९११ चे जवळ जवळ एक दिवशीं तुरुंगावरील अधिकाऱ्यांनीं येऊन सावरकरांस कोठडीबाहेर बोलावलें. कैद्याचे कपडे पुढें केले व सांगितलें कीं, हे घाला. हेग कान्फरन्सचा निर्णय तुमचे विरुद्ध झालेला असून तुम्ही आतां इंग्लिशांचे बंदी आहांत. तुम्हांस ५० वर्षे जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा ठोठावण्यांत आली आहे!

---

# शेवटीं.

झालें त्यांनीं १९११ सालीं जे हे बंदीचे कपडे घातले ते १९२४ ला पुन्हां उतरले, वास्तविक ते धरले गेले तेव्हांपासून म्हणजे १९१० च्या मार्च पासून तो १९२४ च्या जानेवारीपर्यंत ते बंदी शाळेच्या अत्यंत कठोर व तीक्ष्ण जबड्यांत गिळंकृत झालेले होते. त्यास गिळून टाकतांच कारागारानें आपल्या अंदमानच्या उदरांतील जाळत्या जठराग्नींत पचवून जिरवून नाहींसें करण्याचा कसून प्रयत्न केला. त्या जठराग्नींत असे अनेक तरुण चिरून पिसून पचून भस्म होऊन गेले होते. पण सावरकरांनीं त्या जठराग्नीसच उलटें पचवून टाकलें.अखेर त्या कारागाराचें जठर फाडून ते बाहेर आले.अनेक वेळेला अगदीं अत्यवस्थ स्थिती झाली. निराशेच्या कड्यावर उभे असतांना अथवा रुग्णशय्येच्या अंथरुणावर पडले असतांना मृत्यूच्या मुखाच्या गर्तेत कोसळण्यास एक पाय काय तो पुढें पडावयाचा होता. पण तो पडला नाहीं, व सावरकर १९२४ च्या जानेवारीला सुटून परत आपल्या स्वजनांत आले.

* * * * *

या चवदा वर्षांत त्यांनीं काय काय आपत्ती सहन केल्या तें काय सांगावें ? ज्या मनुष्यास एक वर्ष शिक्षा आहे तो मनुष्य एकच वर्ष शिक्षा भोगतो. ज्याला चौदा वर्षें आहेत तो चौदाच वर्षें शिक्षा भोगतो. पण ज्याला पन्नास वर्षें व तेंही जन्मठेप काळेपाणी म्हणजे ज्यांतून सुटेनच असा मुळींच निश्चय करतां येत नाहीं—नाहीं सुटणार हेंच कायतें निश्चयानें सांगतां येतें--अशी अनिश्चित भयंकर शिक्षा असते त्याच्या मनाची यातना भोगलेल्या वर्षांनीं गणली जात नसून त्यामध्यें बहुधा कधींही सुटणें नाहीं या अनिश्चित भयंकर हताशेचीही भर पडली असल्यानें त्याचीं चौदा वर्षें जवळ जवळ पन्नास वर्षें भरण्याइतकींच यातनामय असतात.

* * * * *

आणि त्यांतही एकाच्या दुःखाचाच बोजा उचलावयाचा असता
थोडें हलकें गेलें असतें. त्यांच्यासमोर त्यांच्यासारख्याच—किंबहुना त्य
हूनही कठोर हालांत व अपेक्षेंत झिजत असलेले त्यांचे बंधु गणेशपंतही
ठेपीची शिक्षा भरीत होते. ह्या उभयतां बंधूंस परस्परांचे कष्ट, अपम
छळ पाहून दुःखाचा द्विगुणित भार सहन करावा लागे !

* * * * *

ह्या प्रकरणाचे शेवटच्या भागांत कांहीं गोष्टींचा अगदीं ओझरता उ
करणें प्राप्त आहे. विनायकराव विलायतेंत--त्यांच्यावरही वॉरंट सुटलें
दे. भ. गणेशपंत ह्यांना तर जन्मठेपीची शिक्षा झाली-- डॉ. बाळ ह्यां
त्यांच्यावर आलेल्या आरोपाबद्दल सहामहिन्यांची सजा मिळालेली. साव
कुटुंबाला आश्रय देणें हें त्या वेळीं अखिल महाराष्ट्रांत सरकारी दृष्टीनें
मानलें जात होतें. मग नाशकास तरी दुसरी परिस्थिती कशी असण
विनायकरावांचे श्वशुर श्री. भाऊसाहेब चिपळूणकर ह्यांनीं आपल्या जां
मुळें ओढवलेल्या आपत्तींना मोठ्या प्रेमानें तोंड दिलें. आपल्या मुल
सांभाळ सरकारी त्रासाला कःपदार्थ मानून त्यांनीं त्या काळांत मातेपे
अधिक ममतेनें केला. पण दे. भ. गणेशपंतांच्या बायकोचे मात्र फार
झाले. उभ्या नाशिक शहरांत तिला राहायला जागा मिळेना:—
तें तर लांबच राहिलें मग मामाचा आश्रय कसा मिळावा ? मॅडम काम
कांहीं पैसे पाठवीत म्हणून पोटाची काळजी तरी सुटली ! पण त्या माउ
केवळ जागेच्या अभावीं एका देवळाचा आश्रय करावा लागला ! ही ि
डॉ. बाळ सुटेपर्यंतच्च होती. नंतर पतिविरहानें—त्यांचा तुरुंगांत हो
छळ ऐकून त्या काळजीनेंच त्या झुरत होत्या. गणेशपंत तुरुंगांत गेल्या
पुष्कळ वर्षेपर्यंत परवानगीचे खेळ चालत होते. परन्तु दैवयोग असा
क्षण कीं, ज्या दिवशीं डॉ. सावरकर ह्यांना आपल्या उभयतां बंधूना त्य
कुटुंबासह भेटण्याची परवानगी आली त्याच दिवशीं त्यांचा अंत झा
होता ! ! धन्य ती माउली ! ! !

* * * * *

विलायतेंत जाऊन बॅरिस्टरीची परीक्षा पास झालेला मनुष्य इंग्लिश सरकारच्या हिंदुस्थानांतल्या बंदिवासांत कशा प्रकारें वागविला जातो ह्याचें हृदयद्रावक चित्र आपल्या मनःश्चक्षुंसमोर उभें केलें असतां अंतःकरण खळबळल्याशिवाय राहात नाहीं. बॅ. सावरकर हे एक प्रतिष्ठित राजकीय कैदी होते. असें असतां त्यांना घाण्याला बांधून तेल काढायला लावणें त्यापेक्षां दुसरी दुर्दैवाची गोष्ट कोणती ? ब्रिटिश राज्यकर्ते स्वतः स्वातंत्र्यप्रेमी आहेत पण ते असे अप्पलपोटे आहेत कीं, दुसऱ्यानें मागितलेलें स्वातंत्र्य त्यांना खपत नाहीं. स्वराष्ट्र स्वतंत्र असावें ही इच्छा वाईट काय ? बॅ. सावरकर ह्यांच्यासारख्या राजकीय कैद्याला घाण्याला डांबून तेल काढणें, काथ्या खोलायला लावणें ह्यासारखीं अगदीं बेरड बदमाषाला शोभतील अशीं कामें देण्यांत आलीं. ह्यावरून त्यांच्या इतर झालेल्या हालांची कल्पनाच करणें बरें.

* * * * *

पण तो सर्व त्यांनीं सोसला. त्या हृदयद्रावक प्रसंग या संक्षिप्त चरित्रांत सांगणें अशक्य आहे. इतकें सांगणें मात्र अवश्य आहे कीं, सावरकरांनीं तुरुंगांत सोसलेल्या हालअपेष्टेचा वृत्तांत जसा अद्याप महाराष्ट्रास कळावयाचा आहे तसाच त्यांनीं तुरुंगांतही देशसेवेचें कार्य क्षणभर न सोडतां जे जे प्रयत्न केले त्यांचीही माहिती अजून त्यांचे देशबांधवांना होणें आहे. ही माहिती जेव्हां केव्हां होईल तेव्हां त्यांच्या विषयीं असलेली समाजाचे मनांतील पूज्यबुद्धि व कृतज्ञता हीं द्विगुणित होतील. तुरुंगांतही त्यांनीं हजारों अशिक्षित लोकांस लिहावयास व वाचावयास शिकविलें. शेंकडो शिक्षित लोकांस युनिव्हर्सिटीप्रमाणें अनेक विषयांत " विशारद " करून सोडलें. हिंदुधर्माचे विरुद्ध तुरुंगांतून अनेक मुसलमान लोक झटत असतात व हिंदुंस बाटवून मुसलमानी धर्माची दीक्षा देतात. त्यांचा आज उभीं दहा वर्षें ते प्रतिकार करीत असून शेंकडों—अक्षरशः—शेंकडो मुसलमानांस पुन्हां शुद्ध करून त्यांनीं हिंदु केलेलें आहे. या उद्योगांत कित्येकदां त्यांच्या अंगावर बदमाष मुसलमानांनीं

चालही केलेली होती. गणेशपंतांस दुखापतही झाली होती. पण ह्या सर्व धमक्यांस न जुमानतां त्यांनीं आपलें कार्य अखंड चालविलें होतें. आतां नुकतेंच रत्नागिरीचे तुरुंगांत असतांही एका सिंधी बदमाष मुसलमानाचे कचाटींतून एका बाटलेल्या मनुष्यास सोडवून त्यास पुन्हां हिंदु करून घेतल्यामुळें तेथील सिंधी मुसलमानांनीं सावरकरांचा घात करण्याची धमकी त्यांस दिली होती व एकदां एक सिंधी तर त्यांवर तुटूनसुद्धां पडला. पण अगदीं सुटावयाचे दिवसापर्यंत ते तुरुंगांतील कुठेंही व कोणाही हिंदूवर धार्मिक अन्याय होत असतां शक्य त्या उपायानें त्याचा प्रतिकार करीत असत. तुरुंगांतून त्यांनीं विद्येची अभिरुचि बंदीजनांत इतकी वाढविली कीं, अंदमानच्या तुरुंगांतसुद्धां एकदां शेंकडा ७३ लोक तेथें ब्या. सावरकरांच्या प्रेरणेनें व श्रमानें शिक्षित झाल्याचें जेलरनें मान्य केलें होतें. व आतां रत्नागिरीचे तुरुंगांतही वार्षिक रिपोर्टांत बंदीजनांची शिक्षणप्रियता वाढल्यानें तुरुंगांतील गु कमी झाले असें अधिकाऱ्यांनीं मान्य केलें. त्यांच्या दहा वर्षांच्या निवासानें अंदमानच्या राष्ट्रीय वातावरणाचें तर रूपच्यारूप बदलून गेलें. ह्या त्रोटक उल्लेखांपेक्षां त्यांच्या कारागारांतील अनुभवांचा वृतांत विस्तारशः देणें अशक्य आहे. तो वृत्तांत स्वतः सावरकरच महाराष्ट्र जनतेस स्वमुखानें सांगतील तेव्हां खरें तेथपर्यंत या अल्प चरित्रावरच महाराष्ट्र जनतेला संतुष्ट राहिलें पाहिजे. परमेश्वरा ! श्रीयुत बॅ. विनायकराव सावरकर ह्यांना त्यांना देशकार्य करायला दीर्घायुषी कर ! ! !

## समाप्त.

## सागरास:—

ने मजसी ने परत मातृभूमीला । सागरा प्राण तळमळला ॥ ध्रु ॥
भूमातेच्या चरणतला तूं धूतां । मी नित्य पाहिला होता ।
मज वदलासी अन्य देशीं चल जाऊं । सृष्टिची विविधता पाहूं ।
तैं जननी हृद्‌विरह शंकितहि झालें । परि तुवां वचन तिज दिधलें ।
मार्गज्ञ स्वयें मीच पृष्ठिंवाहीन । त्वरित या परत आणीन ।

चाल:—

गंभीर त्वदाकृति बघुनी ॥ मी
विश्वसलों या तव वचनीं ॥ मी
जगदनुभव योगें बनुनी ॥ मी

येईन त्वरें कथुनि सोडिलें तिजला । सागरा प्राण तळमळला ॥ २ ॥
शुकपंजरिं कीं हरिण शिरावा पाशीं । ही फसगत झाली तैशी ।
भूविरह कसा सतत साहुं या पुढतीं । दशदिशा तमोमय होती ।
गुणसुमनें मी वेंचियलीं या भावें । कीं तिनें सुगंधा घ्यावें ।
जरि उद्धरणीं व्यय न तिच्या हो साचा । हा व्यर्थ भार विद्येचा ।

चाल:—

ती आम्रवृक्ष वत्सलता ॥ रे ॥
नव कुसुमयुता त्या सुलता ॥ रे ॥
तो बाल गुलाबहि आतां ॥ रे ॥

फुलबाग मला हाय पारखा झाला । सागरा प्राण तळमळला ॥ ३ ॥
नभिं नक्षत्रें बहुत एक परि प्यारा । मज भूमिचा तारा ।
प्रासाद तिथें रम्य परी मज भारी । माझी झोंपडी प्यारी ।
तिजवीण नको राज्य मज प्रियसाचा । वनवास तिच्या जरि वनिचा ।

चाल:—

भुलविणें व्यर्थ हें आतां ॥ रे ॥
बहु जिवलग गमतें चित्ता ॥ रे ॥
तुज सरित्पते जी सरिता ॥ रे ॥

तद्विरहाची शपथ घालितों तुजला । सागरा प्राण तळमळला ।
या फेनमिषें हंससि निर्दया कैसा । कां वचन भंगिसी ऐसा ।
त्वत्स्वामित्वा संप्रति जी मिरवीते । भुकनि कां आंग्लभूमितें ।
मन्मातेला अबल म्हणुनि फंसवीसी । मज विवासनेतें नेसी ।

चाल:—

जरि आंग्ल भूमि भयभीता ॥ रे ॥
अबला न माझी ही माता ॥ रे ॥
कथिल हें अगस्तिस आतां ॥ रे ॥

जो आचमनीं एकक्षणीं तुज प्याला । सागरा प्राण तळमळला ॥ ५ ॥

# महाराष्ट्र पब्लिशिंग हाऊस लिमिटेड, पुणें.

## शाळाधिकाऱ्यांस विनंति.

सर्वप्रकारचें शाळा, कॉलेजें यांस लागणारें चिरजीववाङ्मय निर्माण करणारी अशी ही पहिलीच सार्वजनिक संस्था आहे. या संस्थेचे **दहा रुपये देऊन जे सभासद** होतील त्यांस आम्ही प्रकाशित केलेलीं पुस्तकें पाऊणपट किंमतीनें देऊं. **आमचा संपूर्ण प्रॉस्पेक्टस् व कॅटलाग मागवून घ्या.**

### आमचे उत्कृष्ट ग्रंथ.

| | | रु. आ. पै |
|---|---|---|
| १ **हिंदुधर्म आणि सुधारणा** ( म. शि. गोळे. ) | | ३– ०–० |
| २ **गद्यगुच्छ** ( केळकरकृत वाङ्मय-विषयक लेखसंग्रह ) | | २– ०–० |
| ३ **ब्रह्मलिखित** ( कादंबरी ) | | १– ०–० |
| ४ **मराठी शाकुंतल** ( प्रो. लेलेशास्त्री ) | | १– ८–० |
| ५ **काव्यमोहन** ( कृ. गो. किनरे ) | | ०–१२–० |
| ६ **गद्यमणिमाला** | प्रो. श्री. नी. चाफेकर. | ०–१२–० |
| **पद्यमणिमाला** | एम्. ए. एल्एल् बी. | ०–१०–० |
| ७ **न. चिं. केळकर-चरित्र** ( In press ) | | १– ०–० |
| ८ **सुंदर कांडांतील निवडक श्लोक** | | ०– ६–० |



भावास मिंटोचे प्रकरणांत अटक झाली होती तिचें पुढें काय झालें तें कांहींच कळेना. कारण पत्रें सगळीं पोस्टांत गडप होत! वर्तमानपत्रांत तरी बघावें म्हणून हिंदुस्थानी एक दोन वर्तमानपत्रें उघडलीं. इतक्यांत हाटेलाचा धनी आला व ह्मणाला, "Sir I am sorry I cannot keep you here, you must quit this room! The police are after me I shall loose my job!" (महाराज! मी आपल्याला राहूं देण्याला असमर्थ आहे. याबद्दल मला वाईट वाटतें. तुम्ही ही खोली आतां सोडली पाहिजे. पोलिस मला त्रास देत आहे. माझा धंदा बुडेल!) तेव्हां निरुपाय झाला. अर्ध्यारात्रीं विसावा न घेतां तसेंच बाहेर पडावें लागलें! बिऱ्हाड मिळेना! अक्षरशः भर लंडन शहरांत डोकें टेकावयास स्थळ मिळेना!! पैसे देऊन स्थळ मिळेना!!? बरें लंडन सोडावें तर जावें कोठें? हिंदुस्थानांत? ती चिरप्रिय व चिरआकांक्षित आशा भग्न झालेली! खावें काय? ब्यारिस्टरी करून? जी वर्तणूक सुधारल्यानें ब्यारिस्टरी त्याच क्षणीं मिळूं शकती ती वर्तणुक सुधारणें तर या जन्मांत शक्य नाहीं. देशसेवेचा तो छंद, तें व्यसन सुटणें या जन्मांत तर शक्य नाहीं! प्रकृती तर दिवसें दिवस खंगत चालली!!

* * * * *

अशाच एका समयीं ब्रायटनला ते विश्रांतीसाठीं गेले असतां समुद्रकांठीं एकाकीं बसले असतांना तो सूर्यास्त पाहून त्यांना हिंदुस्थानच्या सिंधुतटावरील सूर्यास्ताची आठवण झाली व सहज छंद धरतां धरतां रचलेलें पद शेवटीं दिलें आहे.

# प्रकरण ६ वें.

## पॅरिस व इंग्लंडमधील धरपकड.

पुढें लगेच "तरवार" नांवाचें पत्रही त्यांनीं काढलें. हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे कीं, त्यापत्रांत त्यांनीं आरंभींच हें सांगितलें होतें कीं "जेथें सत्यमत प्रतिपादनास प्रतिबंध असेल तेथेंच गुप्तसंस्था अपरिहार्य व म्हणून न्याय्य होत. जेथें राष्ट्रसंस्थेच्या विकासाला व नैसर्गिक उत्क्रांतीला बलात्कार वाव ठेवीत नसेल तेथेंच क्रांतीचा आघात न्याय्य आहे. राज्यघटनेच्या सौम्य मार्गानें लोकांस आपलें मत जेथें स्थापित करतां येतें अशा इंग्लंड फ्रान्स इत्यादि देशांतून शांतीचे वैध प्रयत्न सोडून क्रांतिकारक गुप्त चळवळी कोण करील तर मात्र तो आततायीपणा होईल. असा शांतीचा, राज्यघटनेचा ( Constitutional ) वैधमार्ग आमच्या देशांत शक्य होतांच आम्ही गुप्त व सशस्त्र प्रतिरोध मोठ्या आनंदानें सोडून देऊं. हिंदुस्थानास स्वातंत्र्य मिळविणें आहे—फार इच्छा आहे कीं, शांतीनें व शांतिनेंच तें मिळवावें. परंतु तुमचा बलात्कार तें अशक्य करतो म्हणून आम्हीही बलानेंच तो बलात्कार हाणू पहातों." सावरकरांनीं हें तरवार पत्र आपले नवागत मित्र वीरेन्द्रनाथ चट्टोपाध्याय यांचेकडे सोपविलें होतें. १९१८ सालीं विनायकरावांनीं सुधारणांबद्दल जें मत दिलें होतें तेंहि याच अर्थाचें होतें कीं 'It is a mockery to talk of constitutional agitation where there is no constitution at all. But it a greater mockery-even a crime-to talk of revolulion when there is a constitution, that allows the fullest development of a nation.'

* * * * *



सावरकरांना ब्रांकाइटसची व्यथा होऊन ते आरोग्यभवनांत वेल्समध्यें जाऊन राहिले होते. संध्याकाळचीं पत्रें येऊन गेलीं. पण डॉक्टरनें सावरकरांस पत्रें वाचणें मना केलें होतें. इतक्यांत एक एका इंग्लिश पत्राचे संपादक त्याच भवनांत आजारी होते. ते सावकरांकडे येऊन त्यांनीं त्यास एक तार दाखविली. तिचा आशय असा होता "गणेश दामोदर सावरकर यांचे अपिलांत त्यांची जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा स्थिर झाली. त्याचप्रमाणें अनंता कान्हेरे यांनीं नाशिकच्या कलेक्टराला गोळी घालून मारलें !

* * * * *

दुसरे दिवशींपासून इंग्रजी पत्रें सावरकरांचें उघड नांव घेऊन या सर्व असंतोषाचें व अत्याचाराचें तेच मूळ आहेत म्हणून म्हणूं लागलीं ! एकच गवगवा झाला. सावरकरांच्या सर्व सहकाऱ्यांनीं सावरकरांनीं फ्रान्सला निघून जावें म्हणून विनंति केली. सावरकरांनीं आपण कार्य सोडून जाऊं इच्छित नाहीं असें सांगितलें. परंतु हिंदी तरुणांनीं आग्रह धरला कीं, " आपली प्रकृति व आपलें स्वतंत्र मुक्त रहाणें हें आम्हांस, कार्यांतलें कार्य वाटत असल्यानें आमचा आग्रह कीं आपण फ्रान्सला आलेल्या मनुष्याबरोबरच निघून जावें." प्यारिसहूनही तशाच तारा व पत्रें आलीं. तेव्हां आजारीपणांतच सावरकरांना इंग्लंडमधील सहकाऱ्यांस व स्नेह्यांस मागें सोडून जातांना हिंदुस्थान सोडलें तेव्हां जितकें विरही व उदास वाटलें तितकेंच त्यांस आतांही वाटलें !

* * * * *

प्यारिसला येतांच आपल्या या तरुण अध्यक्षाचें सर्वांनीं मनापासून स्वागत केलें, आतां लंडन सुद्धन प्यारीस त्यांच्या राष्ट्रीय यत्नांचें केंद्रस्थान होऊं लागलें. तेथें ते म्याडम कामा यांच्या घरीं राहूं लागले. ह्या बाईनीं त्यांचेवर मुलापेक्षांही जास्त प्रेम करून त्यांची व्यवस्था ठेवल्यानें ते लवकरच बरे झाले. या बाई " वंदेमातरम् " नांवाचें इंग्लिश वर्तमानपत्र चालवीत असत. व अमेरिका, जर्मनी व इतर देशीं हिंदुस्थानाच्या आकांक्षांची व चळवळींची

माहिती व व्याख्यानें देऊन मिशनऱ्यांनीं रेखलेलीं हिंदी लोकांचीं भेसुर चित्रें कल्पनेच्या भिंतीवरून हिसडून काढून टाकीत. त्यांनीं प्रथम दादाभाईंच्या निवडणुकीच्या प्रसंगीं त्यांचे हाताखालीं काम केलेलें होतें. पुढें त्या होमरूल सोसायटींत आल्या व निःशस्त्र प्रतिकाराच्या धर्मास धरून राहिल्या. परंतु नंतर त्यांस तें सर्व फोल वाटून त्या अभिनवभारतांत शिरून त्यांतील एक प्रमुख सभासद होऊन बसल्या.

* * * * *

एकदां म्याडम कामाबाई जर्मनीमध्यें गेलेल्या होत्या तेथें जर्मन लोकांचें अखिल सोशियालिस्ट युनियन भरलें होतें. त्या विस्तीर्ण सभेंत कामाबाई साठीं एक हिंदी ललनाग्रणी म्हणून कौतुकानें आमंत्रण दिलेलें होतें. तेथें जाण्याचें आधीं कामाबाईंनीं एक तिरंगी सुंदर ध्वज अभिनवभारतासाठीं सज्ज केलेला होता तो बरोबर घेतला. जेव्हां सभेंत त्यांस बोलावयास आग्रह झाला तेव्हां हिंदुस्थानांतील राज्यक्रांती या विषयावर त्यांनीं व्याख्यान देण्यास आरंभ केला. थोड्याच वेळांत हिंदी महिलेचा तो रेशमी व बहुमोल साडीचा वेष, तें तेज, तो आवेश पाहून सभा आश्चर्यचकित झाली. जो तो ह्मणूं लागला, " She is an Indian princess. " ती एक हिंदुस्थानांतील राजकुमारी आहे, इतक्यांत तो ध्वज एकाएकीं उचलून व फडकावून कामाबाई स्फूर्तिदायक आवेशानें ह्मणाल्या, " This is the flag of Indian Independence. Behold it is boon ! It is already sanctified by the blood of the martyred Indian youths ! I call upon you, gentlemen ! to rise and salute this flag of new India of Indian Independence. " " हा बघा हिंदवी स्वातंत्र्याचा ध्वज. पहा, हा उदय पावला ! हिंदी तरुण हुतात्म्यांच्या रक्तानें हा आधींच पावन झालेला आहे ! नागरिक हो ! उठा, आणि या अभिनव भारताच्या—या हिंदवी स्वातंत्र्याच्या—

ध्वजाचीं वंदना करा! कामाबाईचीं हीं वाक्यें एखाद्या घणाच्या आघातासारखीं त्या सभेच्या वातावरणांत दणदणत शिरलीं! हातानें तो ध्वज आवेशानें फडकावीतच त्या जेव्हां हे आव्हान देत्या झाल्या तेव्हां ती सभा एकदम चित्रासारखी उभी राहिली व स्वतंत्र हिंदुस्थानच्या जगामध्यें प्रथमच उभारलेल्या त्या ध्वजास वंदना ( Salute ) देती झाली !

* * * * *

प्यारीसला आतां हिंदुस्थानांतील कान्हेऱ्यांच्या कटाचा कोर्टांतील वृत्तांत येऊं लागला. कोर्टांत गोऱ्हे, देशपांडे, खरे इत्यादिकांनीं जें सांगितलें कीं, आमच्याकडून वृत्त काढून घेण्यासाठीं पोलिसांनीं छळ केला, तीही बातमी आली. पोलिस म्हणाले कीं, हें सर्व खोटें, छळबीळ कांहीं झाला नाहीं तीहि बातमी आली. खरें कांहींच कळेना. इकडे लंडनमध्येंही मागें उरलेल्या हिंदी तरुणांस वारंटें सुटणार अशी भूमका उठल्यानें त्यांनींही लंडन सोडून जावें अशीं बोलणीं आरंभिलीं गेली. पण सगळ्यांनीं लंडन सोडलें तर तेथें काम तरी कोण करणार? बरें आपण त्यांस लंडन सोडूं नका ह्मणावें तर त्याचा विपर्यासही कोणी करूं शकेल. इंग्लिश पत्रें तर ह्मणणारच. व ह्मणतच होतीं कीं, स्वतः आगी बाहेर राहून इतर अपक्क तरुणांस सावरकर आगींत ढकलीत आहेत. तरी बरें ह्या तरुणांपैकीं बहुतेक सर्व लोक ढिंगरासुद्धां—सावरकरांपेक्षां दोन पावसाळ्यांनीं वडीलच होते. तेव्हां जें होईल तें होईल. आपण प्यारिसला न राहतां इंग्लंडमध्येंच जावें. ह्मणजे धरले गेलों तर निदान कार्य मरेतों केल्याचें समाधान लाभेल व एका महान् स्वार्थत्यागाचें शिक्षण व धडा राष्ट्रापुढें आपल्या मरणानें ठेवला गेल्यानें इतरांसही तसेंच झुंजत राहण्याची स्फूर्ती येईल. बरें न धरलों गेलों तर लंडनमध्यें प्यारिसपेक्षां अनेकपटीनें जें राष्ट्रकार्य करतां येण्यासारखें आहे तें करतां येईल व इतरांस लंडन सोडून जाऊं नका असें सांगण्यास आपणांस अधिकार प्राप्त होईल. शत्रूंचे कुतर्केही खुंटून जातील. सावरकरांस वारंवार

असें वाटे, पण प्यारिसचे मित्र तो बेत खुडून काढीत. अशा द्विधा स्थितात कांहीं दिवस गेले.

* * * * *

सावरकरांना प्यारिसहून लंडनमध्यें परत येण्यास काय काय बनाव कारणें झालीं याची रहस्यमय हकीगत अजूनही पूर्वीप्रमाणेंच गूढाच्या छायेनें आवृत आहे. ती ज्यावेळीं खुद्द सावरकरच सांगतील त्याच वेळीं आपणांस कळेल. तोंपर्यंत हें एक इतिहासाला गूढच म्हणून राहणार. तरीही इतकें मात्र खरें कीं, पुढें वर्णन केलेली गोष्ट, जीं अनेक कारणें घडलीं त्यांतील एक कारण होती असें त्यांच्या एका निकटवार्ति स्नेह्यानें सांगितलें आहे. ती हकीगत अशीः—प्यारिसमध्यें एक सुंदर क्रीडानदी केलेली आहे. त्या बाजूस एक दिवस सावरकर व त्यांचे सहकारी मित्र हरदयाल फिरावयास गेले. हरदयाल हे प्रथम सिव्हिल सर्व्हिसची परिक्षा देण्यास सरकारी शिष्यवृत्तीनें इंग्लंडला आले होते. पण तेथें त्यांचा मतविकास होत होता. ते अभिनवभारताचे गोटांतील एक प्रमुख कार्यकारी झालेले होते. त्या सुंदर क्रीडा नदीवर अनेक ओळखीचे हंसजातीय पक्षी क्रीडा करीत होते. नाना फुलें फुललेलीं होतीं. कृत्रिम धबधबे मंजुळ पतन घेत घेत नदींत उतरत होते. तो शुद्ध सुगंधित वायु खोल श्वासोश्वास करीत वैद्यांनीं सांगितल्याप्रमाणें ते उभयतां नदीकांठानें क्षणभर हिंडले. तों एक मराठी वर्तमानपत्र खिशांतच राहिलेलें होतें तें वाचावयास सावरकरांनीं हातांत घेतलें. परमप्रिय स्नेह्यांवर, जीव कीं प्राण असलेल्या धाकट्या भावावर, सहकारी संवगड्यांवर, लाडक्या शिष्यांवर, पूज्य देशभक्तांवर देशांत हे प्रसंग, हे छळ, हे बंदिवास गुजरत असतां मी येथें क्रीडानदीवर पक्ष्यांची व फुलांची सुंदरता पहात रमतों आहें ना? माझ्या उपदेशानें प्रेरित होऊन, माझ्या शब्दांबरोबर आपला प्राण देणारे हे माझे आप्त इष्ट व देशबांधव तिकडे जाच, छळ सोशीत असतांना व तुरुंगांतील अंधाऱ्यांतून अन्नाशिवाय

कुजत पडले असतांना मी प्यारिसमधील शुद्ध सुगंधित वायु सेवन करून खोल खोल श्वासोश्वास करीत हिंडावें ना! हाय! हाय! त्यांस हें कळेल तर ते मला नीच म्हणून म्हणणार नाहींत काय! त्यांनीं ह्मटलें तर त्यांचा काय दोष!

हे व असलेच विचार सावरकरांच्या डोक्यांत काहूर करून उठले व त्यासरशीं हा अभिजात कुलांत उत्पन्न झालेला, उच्च ध्येयाकडे भरारी मारणारा, स्वतःच्या प्राणांस लीलेनें मातृभूमीकरितां हवन करण्यास सिद्ध झालेला हा उदार, भावनाप्रधान तरुण निश्चय करून उठला कीं, "मी परत लंडनला जाणार! मी माझे भाऊ, स्नेही, सहकारी अशा अनेक देशवीरांबरोबर पहिल्या सरबत्तींतच देशाच्या कामास येणार! मी पॅरिसला रहाणार नाहीं. सगळेच मागें राहिले तर मरणार तरी कोण! जो तो विजय पहावयास इच्छूं लागला तर लढाईचे तोंडावर उभा राहून विपक्षाची पहिली फैर छातीवर झेलणार तरी कोण! छे, मी जाणार!!

* * * * ७

पंडित शामजींचा सावरकरांवर अतिशय लोभ असे. ते वारंवार म्हणाले छे! छे! आपण जाऊं नये! "Thou art a general! Thou must not go to the trenches." आपण सेनापति आहां! आपण लढाईच्या तोंडावर जातांकामा नये, सेनापती का कधीं सायपर्स व मायनर्समध्यें जातो!" सावरकर हें ऐकून अधिकच लाजत. त्यांस वाटे कीं, जे तोंडावर फौजेंत धरले गेले त्यांस शिपाई म्हणावें व आपण जे मागें मागें कातडें बचावून रहातों त्यांनीं जनरल म्हणवावें हें कसेंसेंच दिसतें. मी तोंडावर जातों. धक्काधक्कींत गोळागोळींत सुटून पुन्हां जिवंत आलों तर जनरल म्हणवीन व मागें राहीन! सगळ्यांनीं मोडा घातला पण ह्यांनीं जातोंच म्हटलें. आणखी कांहीं कारणें त्यांच्या पॅरिसहून लंडनला जाण्यास झालीं होतीं पण तें सविस्तर वृत्त जेव्हां ते स्वतःच प्रसिद्ध करतील तेव्हां कळेल. तेथें अति संक्षेपतः अगदीं प्रसिद्ध असलेल्या व कांहीं त्यांच्या

विश्वासू मित्रांच्या तोंडून ऐकलेल्या शब्दांचींच काय तीं अवतरणें देणें शक्य आहे.

*　　*　　*　　*　　*

हें साल १९१० चें होतें. शेवटीं सावरकर लंडनला जाणाऱ्या बोटींत चढले. स्टेशनवर प्यारीसमधले सर्व हिंदी लोक, व्यापारी व विद्यार्थी पोंचविण्यास आलेले होते. त्या सर्वांचें सावरकरांवर विलक्षण प्रेम व विश्वास होता. त्या सर्वांस त्यांनीं पुनः पुन्हां सांगितलें कीं, आतां येतों!" "Upto this time yon have seen how I tried my best to work much. Now let me see if I can also suffer much!" "आजपर्यंत शक्य तितकें काम करण्याचा प्रयत्न मी करीत आलों आतां शक्य तितकें पुष्कळ सहन करण्याची अनुज्ञा असावी!" गाडी चालू झाली. बोटही चालू झाली. इंग्लंडला लागली. सावरकर उतरले व गाडींत बसले. डब्यांतच पोलिसांचा गुप्तपणें कडेकोट सशस्त्र पहारा होता. लंडनच्या स्टेशनांत ट्रेन घुसली. सावरकरांचा डबा येतांच "इथेंच! इथेंच!" म्हणून लष्करी आज्ञा क्रूर व कठोर ध्वनीनें सुटून तो डबा व सावरकर घेरले गेले!!

*　　*　　*　　*　　*

दुसरे दिवशीं ही बातमी सर्व जगांतील पत्रांत फडकली. सावरकरांच्या मित्रमंडळीवर तर ही अकल्पित वीजच कोसळल्यासारखें झालें. कोर्टांत पोलिसांचा पहारा असतांही लोकांची दाटी झाली. सावरकरांना डॉकमध्यें आणतांच प्रेक्षकांचा आदर अनावर होऊन टाळ्यांचा कडकडाट झाला. इंग्लिश पत्रांनीं फोटो काढण्याचा सपाटा चालविला! सावरकरांस सांगण्यांत आलें कीं, मरण वा जन्मठेप काळेंपाणी या दोनच शिक्षांतून एक कोणची तरी शिक्षा असलेल्या १२१ इं. पि. च्या कलमाखालीं आपणांस धरलेलें आहे!!

इंग्लंडच्या ब्रिस्टन जेलमध्यें त्यांस कोंबण्यांत आलें. इथेंच ते डिंग-रास भेटावयास मागें आलेले होते. तेथील त्यांच्या दिनचर्येची, त्यांस तेथून पळवून नेण्यासाठीं झालेल्या विलक्षण कटांची, त्यांच्यासाठीं भेटाव-यास येणाऱ्या स्नेह्यांत लागणाऱ्या चढाओढीची, त्यांच्यावरील खटल्यांतील व अपीलांतील डावपेंचांची, त्यांच्यासाठीं उभारलेल्या फंडांत हिंदींच काय पण आयरिश लोकांनींहि वर्गणी व सहाय्य कसें दिलें त्याची व जज्जांनीं हिंदुस्थानांत त्यास धाडावें अशी शेवटीं आज्ञा केली तेव्हांच्या त्यांच्या भाषणाची अत्यंत मनोरंजक व मर्मभेदक माहिती या संक्षिप्त चरित्रांत सांगतां येत नाहीं यास आमचा निरुपाय आहे.

* * * * *

अखेर इंग्लंडांतून हिंदुस्थानांत विनायकरावांना धाडावें असें अपील कोर्टानें फरमाविलें. हिंदुस्थानांतील कोर्टासमोर जाणें म्हणजे फांशी वा अंदमानला जाणें होय हें निश्चित होतें. म्हणून आपले सालिसिटरहस्तें विनायकरावांनीं आपल्या वहिनीस आपलें "मृत्युपत्र" लिहून धाडलें. आपणांस पुन्हां कोणाला स्वतंत्र पत्र लिहितां येणें व कोणाशीं बोलणें बहुशा शक्य होणें नाहीं. म्हणून या जगतांत आपल्या प्रेमाच्या माणसाशीं उच्चा-रला जाणारा तो आपला शेवटचा संदेश आहे असें समजून त्यांनीं एक काव्यमय पत्र लिहिलें होतें तें खालीं दिलें आहेः—

## माझें मृत्युपत्र.

वैशाखिचा कुमुदनाथ नभांत हांसे ॥
यच्चंद्रिका धवल सौधतलीं विलासे ॥
घाली स्वयें जल जिला प्रिय बाल खासे ॥
जाई फुलें चिमुकलीं नटली सुवासें ॥ १ ॥

आले घरीं सकल आप्त सहृद् जिवाचें ॥
आनंदमग्न कुल गोकुल काय साचें ॥
आदर्श दीप्ति--शुचिता--धृति--यौवनांचें ॥
पाहूनि जें तरुण--मंडल कीर्ति नाचें ॥ २ ॥

प्रेमें हृदें विकसलीं नव यौवनाच्या ॥
गंधें सुवासित उदात्त सुसंस्कृतीच्या ॥
दिव्यालता तरुसि जें गृह बाग झाला ॥
ज्या पौर हर्षित वदे जन ' धर्म--शाला ' ॥ ३ ॥

स्वैंपाक त्वां निजकरें कुशले करावा ॥
प्रेमें तुझ्या अधिकची सुरसाल व्हावा ॥
संवाद सर्व मिळुनी करितां नितांत ॥
जेवावयासि बसलों जईं चांदण्यांत ॥ ४ ॥

श्री रामचंद्र वनवास कथारसाला ॥
कीं केंवि देश इटली रिपुमुक्त झाला ॥
तानाजिचा समरधीर तसा पवाडा ॥
गावा चितोरगड वा शनवार वाडा ॥ ५ ॥

झाली कशी प्रियकरा अपुली अनाथा ॥
दुर्दास्यखिन्न शरछिन्न विपन्न माता ॥
शोकें विवंचुनि तिच्या जइं मोचनाचे ॥
केलें अनंत तरुणा उपदेश साचे ॥ ६ ॥

तो काल रम्य, मधुरा प्रिय संगती ती ॥
तें चांदणें, नवकथा--रमणीय रात्री ॥
तें ध्येय दिव्य निजमातृ--विमोचनाचें ॥
तो उग्र निश्चयहि, ते उपदेश साचे ॥ ७ ॥

झाल्या तदा प्रियकरांसह आण भाका ॥
त्या सर्व देवि वहिनी स्मरती तुम्हां कां ? ॥
'बाजी प्रभू ठरूं' वदे युव संघ सर्व ॥
'आम्हीं चितोर युवती' युवती सगर्व ॥ ८ ॥
कीं घेतलें व्रत न हें अम्हि अंधतेनें ॥
लब्धप्रकाश इतिहास–निसर्ग–मानें ॥
जें दिव्य दाहक म्हणूनि असावयाचें ॥
बुध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें ॥ ९ ॥

२

ज्या होति तें प्रिय जनांसह आणभाका ॥
त्यांतें स्मरोनि मग सांप्रत हें विलोका ॥
नाहीं पुरीं उलटलीं जरि आठ वर्षें ॥
तों कार्यसिद्धि इतुकी मन कां न हर्षे ? ॥ १० ॥
आसेतुपर्वत उचंबळला स्वदेश ॥
वीराकृती धरित टाकुनि दीनवेष ॥
भक्तांचिया रघुपदीं झुलताति झुंडी ॥
जाज्वल्य होयाहि हुताशन यज्ञकुंडीं ॥ ११ ॥
तो यज्ञ सिद्ध करण्यास्तव उग्र दीक्षा ॥
जे घेति येइ तइं तत्कृतिची परीक्षा ॥
"विश्वाचिया अखिल मंगलधारणाला ॥
बोला असे कवण भक्ष्य हुताशनाला" ॥ १२ ॥
आमंत्रण प्रभु रघूत्तम सोडितां हें ॥
दिव्यार्थ, देव ! आमुचें कुल सज्ज आहे ॥
हे साध्वि ! गर्जुनि असे पहिल्या हवीचा ॥
हा ईश्वरीं मिळविला अम्हि मान साचा ॥ १३ ॥

धर्मार्थ देह वदलों ठरलें नितांत ॥
ते बोल-फोल नचि बालिश बायकांत ॥
ना भंगली भिउनिया धृति यातनांनां ॥
निष्काम--कर्मरति योगाहि खंडिला ना ॥ १४ ॥
ज्या होति तैं प्रियजनांसह आणभाका ॥
केल्याचि सत्य कृतिनें अजि ह्या विलोका ॥
दीप्तानलांत निजमातृ--विमोचनार्थ ॥
ह्या स्वार्थ जाळुनि अम्हीं ठरलों कृतार्थ ॥ १५ ॥

३

हे मातृभूमि तुजला मन वाहियेलें ॥
वक्तृत्व--वाग्विभवही तुज अर्पियेलें ॥
तूंतेंचि अर्पिलि नवी कविता वधूला ॥
लेखांप्रती विषय तूंचि अनन्य झाला ॥ १६ ॥
त्वत्स्थंडिलीं ढकलिलें प्रिय मित्रसंघा ॥
केलें स्वयें दहन यौवन--देह--भोगा ॥
त्वत्कार्य नैतिक सुसंमत सर्व देवां ॥
तत्सेवनींच गमली रघुवीरसेवा ॥ १७ ॥
त्वत्स्थंडिलीं ढकलिली गृह वित्त मत्ता ॥
दावानलांत वहिनी नवपुत्रकांता ॥
त्वत्स्थंडिलीं अतुल--धैर्य वरिष्ठ बंधु ॥
केला हवी परम कारुण पुण्यसिंधु ॥ १८ ॥
त्वत्स्थंडिलावरि बळी प्रिय बाल झाला ॥
त्वत्स्थंडिलीं बघ अतां मम देह ठेला ॥
हें काय बंधु असतों जरि सात आम्हीं ॥
त्वत्स्थंडिलींच असते दिधले बळी मी ॥ १९ ॥

संतान या भरतभूमिस तीस कोटी ॥
जे मातृभक्ति--रत--सज्जन धन्य होती ॥
हें आपुलें कुलहि त्यामधि ईश्वरांश ॥
निर्वंश होउनि ठरेल अखंड वंश ॥ २० ॥

४

कीं तें ठरोहि अथवा न ठरो परंतु ॥
हे मातृभू अम्हि असो परिपूर्ण हेतू ॥
दीप्तानलांत निजमातृविमोचनार्थ ॥
हा स्वार्थ जाळुनि अम्हीं ठरलों कृतार्थ ॥ २१ ॥
ऐसें विवंचुनि अहो वहिनी ! व्रतातें ॥
पाळोनि वर्धन करा कुल दिव्यतेतें ॥
श्रीपार्वती तप करी हिमपर्वतीं ती ॥
कीं विस्तवांत हंसल्या बहुराजपूती ॥ २२ ॥
तें भारतीय--ललना--बल--तेज कांहीं ॥
अद्यापि या भरतभूमित लुप्त नाहीं ॥
हें सिद्ध होइल असेंच उदार उग्र ॥
वीरांगने ! तव सुवर्तन हो समग्र ॥ २३ ॥
माझा निरोप तुज येथुनि हाच देवी ॥
हा वत्स वत्सल तुझ्या पदिं शीर्ष ठेवी ॥
सप्रेम अर्पण असो प्रणती तुम्हांतें ॥
आलिंगन प्रियकरा मम अंगनेतें ॥ २४ ॥
कीं घेतलें न व्रत हें अम्हीं अंधतेनें ॥
लब्धप्रकाश--इतिहास--निसर्गमानें ॥
जें दिव्य दाहक म्हणोनि असावयाचें ॥
बुध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें ॥ २५ ॥

* * * * *

हिंदुस्थानांत सावरकरांना आणण्याचा हुकूम सुटला पण तो अजून कृतींत उतरावयाचा होता. नेहमींचा मार्ग म्हणजे इंग्लिश खाडींतून फ्रान्स-मधून जावयाचें पण सावरकरांना हिंदुस्थानांत नेणें हें कांहीं निर्विघ्नपणें पार पडणार नाहीं असा पोलिसांना प्रथमपासूनच संशय असल्यानें त्यांनीं फ्रान्सचा मार्ग पूर्णपणें टाळण्याचें ठरविलें. इकडे फ्रान्समध्येंही हिंदी पुढारी सावरकर फ्रान्समध्यें शिरतांच फ्रेंच कोर्टांत बलात्काराच्या बंदीचा दावा इंग्लिश पोलिसावर आणण्यास टपलेलेच होते. म्हणून इंग्लंडमधून निघून कोणत्याही अन्य राष्ट्रीय बंदरास न लागतां थेट हिंदुस्थानास न्यावें असे बेत करून इंडियन व इंग्लिश पोलिसचे नामांकित आफिसर धाडून मोठ्या कडेकोट बंदोबस्तानें सावरकरांस घेऊन बिस्केच्या आखातानें गलबत हाकारण्यांत आलें.

* * * * *

त्यावेळेस दोनच विचार सावरकरांच्या डोक्यांत घोळत होते. एक तर आपणांला पकडण्यांत पोलिसनें व सरकारनें मोठी चतुराई केली ही त्यांची पोकळ घमेंड तोडून त्यांच्या या सर्व बंदोबस्तास धूळ चारून शक्य तर स्वपराक्रमानें निसटून पुन्हां कार्य आरंभावें. किंवा तें न साधल्यास निदान असें कांहीं तरी साहस करावें कीं, युरोपच्या सर्व देशांचें लक्ष क्षणभर तरी हिंदुस्थानच्या राजकारणाकडे सादर वेधून जावें. युरोपभर हिंदुस्थान म्हटला म्हणजे बायकांस जिवंत जाळून त्यांस सती म्हणणारा व पोरें जन्मतांच गंगेंत फेंकून देऊन त्यांस पूज्य समजणारा धर्मवेडा, भोळा व स्वेच्छेनें इंग्रजांच्या गुलामगिरींत राबणारा देश होय. अशी साधारण समज इंग्रजी मिशनऱ्यांनीं व प्रचारकांनीं फैलावल्यामुळें प्रचलित होती. युरोपच्या बायका बोलतां बोलतां झटकन विचारीत "तें असेल! तुम्ही पूर्वी मोठे पंडित असाल पण एक धनगराचें पोर जितक्या शेळ्या हातीं ठेवूं शकत नाहीं,

त्याच्या अनेक पट तुमचीं जिवंत माणसें एक इंग्लिश पोर वळवीत व सांभाळित असतें ना ? तर मग तुम्हीं गुलामगिरीला योग्यच आहांत. तुम्हांत जेव्हां साहस येईल, तुमच्यांतील एकेक स्वातंत्र्यप्रेमी तरुणास सांभाळतां सांभाळतां दहा दहा इंग्रज हात टेकतील तेव्हांच आम्हीं समजूं कीं, इंग्रज तुमच्यावर केवळ बलात्कारानें राज्य करीत आहेत. " त्यावेळेला युरोपांत असलेली ही हिंदी लोकांविषयींची समज घालविण्याकरितां हिंदुस्थानच्या आकांक्षांची व त्याच्या त्या सफल करण्याच्या कठोर निश्चयांची सर्व जगतास सूचना देणें अवश्य होतें असें त्यांस वाटलें असावें.

* * * * *

युरोपांतील त्या वेळेस प्रचलित असलेला हा समज आज पुष्कळ कमी झालेला आहे. आज युरोपांत हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यगामी राष्ट्राकांक्षेस आंतरराष्ट्रीय महत्व आलेलें आहे. देशासाठीं व राष्ट्रासाठीं प्राणदान करणारे मोठमोठे वीर, हुतात्मे व तपस्वी हिंदुस्थानांत आहेत हें सिद्ध करण्याची आज आवश्यकता राहिली नाहीं. आज हिंदुस्थानांतील जे राजकारणी लोक तिकडे काम करीत आहेत, त्यांस बायका हंसून आज तसें विचारूं शकत नाहींत. कारण ज्यांस सांभाळतां सांभाळतां दहा दहा इंग्रजांस नाकीं नव यावे असे कांहीं स्वातंत्र्यप्रेमी तरुण हिंदुस्तानांतही निघाले आहेत. युरोपमध्यें हिंदुस्थानच्या राजकारणाविषयीं वाटत असलेली तुच्छता अथवा तिरस्कार काढून टाकून त्यांस त्याचें महत्व पटवून देणाऱ्या साहसी पुरुषांमध्यें सावरकर हे निस्संशय प्रथम व प्रमुख होत.

* * * * *

या दोन विचारांनीं प्रेरित होऊन ते एकसारखी संधी पहात टपत होते कीं, या यांच्या कडेकोट बंदोबस्तांतूनही आपणांस काय करतां येईल.

त्यांनीं ती संधी साधण्यासाठीं किती कुशलतेनें सर्व व्यूह रचला व पदोपदीं पोलिसाचे चातुर्यास कशी धूळ चारली ती अतिमनोरंजक माहिती इथें विस्तरशः देतां येणें शक्य नाहीं. ती त्यांचे तेच जेव्हां लिहितील तेव्हां कळूं शकेल. इतकें मात्र खरें कीं, बोट मार्सेलिसच्या बंदराकडे जाणार नाहीं हें प्रथम प्रसिद्ध केलें असतांही ती एकाएकीं मार्सेलिसला जाऊं लागली. सावरकरांचे मनांत आशा उदय पावली कीं, न जाणो आपली मंडळी बोटीवर येऊन कांहीं सहाय्य करूं शकतील. पण बोट मार्सेलिसला पोचतांच कोणीही सहाय्यक दिसेना. इतकेंच नव्हे पण त्यांस सोडून पोलिस एक मिनिटभरही दूर होईनात. केवळ स्नानाचे खोलींत त्यांस कोंडीत तेव्हां वा शौचास जातेवेळीं जरा दूर पण दाराशीं खेटूनच उभे राहत. इतकेंच नाहीं पण दाराचे समोर एक मोठा आरसा ठेवून त्यांतून प्रतिबिंबानें आंत काय करीत आहेत हें टक लावून पहात. दोनदां त्यांचें लक्ष्य चुकवून निसटण्याचा प्रयत्न केला. दोनदां फसला. पण दोनदांही तो केला हें एक सावरकरांचें सावरकरांनाच कळलेलें होतें.



# प्रकरण ७ वें.

## बोटीवरून समुद्रांत उड्डाण.

प्रातःकालही झाला नव्हता. बोट सुटण्याचे वेळीं प्रवाशांची ये जा चाललेली होती. दोघेही युरोपियन पोलिस आफिसर निजलेले व एक जागत बसलेला व त्या सर्वांचे मध्यें सांवरकरांस घालून त्या लहान पांच सात पावलांच्या खोलीचें ( क्याबिनचें ) दार लावलेलें. आतां थोडक्या वेळानें बोट सुटणार. जें काय शक्य असेल तें आतांच करतां येईल. पण करतां काय येईल ? हे तर सर्व सावध. तथापि ठरल्याप्रमाणें आणखी एकदां तिसरा प्रयत्न करून पहावा मग जें होईल तें होवो ! सावरकर त्या जागत्या शिपायास म्हणाले, "शौचास चलावें पहाट झाली आहे" पण तो एकटाच चला म्हणण्याचे स्थलीं आपल्या ऑफिसरांस जागें करूं लागला ! सावरकर समजले घात झाला. तरी पुढें पाहूं या. आफिसर व तो शिपाई हे दोघे दोहोंबाजूनें त्यांस मध्यें घालून शौचाचे खोलीकडे गेले. पोलिसांनीं एक रतिमात्रही त्यांचा कडेकोट बंदोबस्त ढिला केलेला नव्हता. शौचाचे खोलीस काचेचें दार. समोर आरसा. सावरकर काय करतात तें दारास लागूनच एकसारखा तो शिपाई पहात हाता. शौचाचे खोलीचे वर मात्र एक पोर्ट होल म्हणजे अगदीं लहान वाटोळी खिडकी होती. व तिचें काचेचें दार थोडें किलकिलें केलेलें होतें. या खिडक्या गलबतावर बहुतेक एकाच आकाराच्या असल्यानें त्यांचें साधारण मोजमाप मोठ्या चातुर्यानें सावरकरांनीं पहिल्यानींच केलेलें होतें. पण त्या खिडकीपर्यंत पोंचावें कसें ? आपण थोडे हललों तरी समोरचा शिपाई बोंब मारणार मग चढावें कसें ? जर प्रयत्न फसला तर खटल्याचा सर्व रंग आणखी

काळा कुट्ट होणार. पोलिस, यमयातना व मारहाण करण्यास सोडणार नाहींत. मागून गोळ्याही झाडणारच ! पण या सर्व प्रश्नांचा व परिणामांचा विचार त्यांनीं मागेंच केला असल्यानें व आयुष्याची आशा त्यांनीं कधींच सोडली असल्यानें ते आपल्या मनाशीं पण स्पष्टपणें पुटपुटले, " Now or never ! " आतांच ! नाहीं तर पुढें अशक्य !

* * * * *

झटपट त्यांनीं अंगावरचा सहेतुकच आणलेला लांब गाऊन--अंगरखा-काचेच्या दारावर टाकला. त्या योगें त्या शिपायास किंचित् अंधुक दिसूं लागल्यानें तो मागें पहात आहे तोंच एका उडीसरशीं दोन तीन लांकडें पकडून सावरकर खिडकींत आले. "क्या क्या करता ? " इतकें तो शिपाई ओरडतो व शुद्धीवर येतो न येतो तों अंगांत सहेतुकच प्रथमपासून घातलेल्या तंग गंजीफ्राकचे विजारीसह सावरकर खिडकींत अंग घुसडून सरकूं लागले ! तोंच मागें शिपायानें एकसहा बोंब मारून काचेचें दार लाथ मारून फोडलें. मागें तो घुसतो तों पुढें सावरकर खिडकींतून निसटले. ताड ताड गोळ्यासारखे आवाज, बोंबा, शिव्यांचा कल्लोळ ! सावरकर समुद्रांत उडी घालून गोळी आपल्यास न लागावी म्हणून डुबकी घेऊन पुढें चालले. खिडकीपाशीं शिपाई व अधिकारी आले पण त्यांची छाती उडी घेण्यास होईना—किंबहुना तें अशक्यच होतें. ते परत बोंब घालीत बोटीच्या कप्तानाकडे पळाले. सर्व बोट खडबडून उठली. व डाब्रिज ( फेंका पूला ) वरून तटावर उतरण्यासाठीं लगबग धावूं लागले. त्या संधींत समुद्र पोहून सावरकर तटास लागले. पण पुढें ती उंचच उंच तटाची भिंत आली. आजूबाजूस लोक बोटीवरील बोंबेनें सावध होऊन आडवे आले होते.

* * * * *

लहानपणीं संस्थेंत शरीरपरिवर्तनाचे जे नियम असंत, त्यांत एक नियम असे कीं, तटावर चढण्याची प्रत्येकानें संवय करावी ! ती संवय कामास आली. सावरकर तट चढून फ्रान्सच्या भूमीवर उतरले. त्यांचे चित्तांत स्पष्टपणें विचार आला कीं हीच फ्रान्सची भूमि ! मी हिला शिवलों आहें ! मी आतां फ्रान्सच्या रक्षणाखालीं आलों आहें ! माझें अर्धें काम झालें. पुढील अर्ध हो वा न हो !! त्यांनीं एक दीर्घ श्वास घेतला. फारा दिवसांनीं स्वतंत्र वायु मी हुंगीत आहें अशी आठवण त्यांस झाली व तो श्वास त्यांस खरोखरच अत्यंत मधुर लागला ! पण एकच श्वास तो !!

* * * * *

कारण इतक्यांत तिकडे बोटीवरील सारे अधिकारी नौकर व पोलिस धापा टाकीत धांवत ओरडत "चोर धरा ! चोर धरा ! " म्हणून आरोळी उठवीत आले. सावरकर तटावर येतांच थकले असतांनांही क्षणभर न थांबतां सरळ बाणासारखे पुढें घुसले. धांवतां धांवतां पुन्हां पुन्हां वळून मागें पहात तों इंग्रज चहूंकडून कोंडीत येत आहेत. आजूबाजूस पुन्हा पुन्हा पहात कीं, चुकुन एखादा जरी हिंदी मनुष्य इथें दिसेल तरी त्याचेकडून प्यारिसला व फ्रेंच म्याजिस्ट्रेटला तार देववीन व या फ्रान्सच्या कायद्याचे विरुद्ध चाललेल्या व मला धरून तुरुंगांत टाकणाऱ्या इंग्लिश पोलिसांसच धरून तुरुंगांत टाकवीन ! पण कोणी स्वजन दिसेना ! स्वजन, स्वदेश तर दहाहजार मैलावर राहिले पण स्वराज्याचे कल्याणासाठीं विदेशांत मृगया होत असलेल्या ह्या एकाकी पंचवीस वर्षांच्या तरुणास कोणी एखादा पैसा जरी देईल तरी त्या उभ्या आडव्या धावणाऱ्या ट्राममध्यें बुडी घेऊन तो कोठल्याकोठें निघून जाऊन मृत्यूच्या दाढेंतून सुटेल. आतां त्याचें जीवन वा मरण एका पैशावर अवलंबून आहे !

* * * * *

पण एक पैसाही कोठून मिळणार ? पण तो तरुणही हात पाय गाळणारा नव्हता ! फ्रेंच पोलिस ! फ्रेंच पोलिस म्हणून हांक मारीत तो एकसारखा पुढें धावत होता. मागें व आजूबाजूनीं चोर ! चोर ! म्हणून खोटाच आरोप उठवीत ते पांच पन्नास माणसांचें लटांबर धांवत येत होतें. पण त्यास धरूं शकत नव्हतें. आतां तर मागच्याच्या ओरडीनीं उत्तेजित फ्रेंच मार्गस्थलोक पुढूनही आडवे झाले. पण आट्यापाट्याप्रमाणें हुलकावण्या दाखवीत तो हिंदी तरुण तसाच पुढें धांवत निसटत सगळ्यांस चकवीत चाललाच होता. इतक्यांत बाजूस एक फ्रेंच पोलिस दिसला ! बस्स या स्थलीं या पोलिसाचे हातीं स्वेच्छेनें जाऊन त्यास सांगावें कीं, फ्रेंच म्याजिस्ट्रेटकडे घेऊन चल तिथें मी चोर नसून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यार्थ इंग्लंडशीं झुंजत असल्यानें धरला गेलेला एक इंग्लंडचा राजकीय बंदी आहे व फ्रान्सचा एक स्वतंत्र व निर्दोष अभ्यागत आहें ! असले परिस्थितींत हेंच सर्वोत्तम ! असें योजून ते उभे राहिले. फ्रेंच पोलिस आला. पण त्याचे मागोमाग चहूंकडचा तो पाठलाग करणाऱ्या इंग्रजांचा घोळकाही आला. त्यांनीं त्या फ्रेंच पोलिसास आधींच मथवून ठेवलेलें होतें. ते आंगावर मोठमोठ्या जरीच्या फिती लावलेले बलाढ्य इंग्रज सरकारचे अधिकारी ते सांगतात कीं हा चोर आहे ! हें एक मिसूर न फुटलेलें, अंगांत एक गंजीफ्राकची तुमान असलेलें, धुळीनें भरलेलें व एका पददलित हिंदुस्थान नांवाच्या कुलीच्या देशांतलें कोणातरी कुलीचें भिकारी मूल--हें चोर असलेंच पाहिजे ! त्यांनीं सावरकराचा हात बळकट धरला. सावरकरांनीं पुन्हां बजावलें कीं, मी चोर असलों तरी तुला फ्रेंच कोर्टांत नेल्याविना मला दुसऱ्या कोणाच्याही हातीं देतां येत नाहीं ! पण तो एक यःकश्चित फ्रेंच पोलिस कायद्याच्या शब्दांशीं असलेल्या परिचयापेक्षां सोन्याच्या गिन्यांशीं असलेला त्याचा परिचय व त्याचा लोभ हा केव्हांही अधिक असणारच ! तो त्या द्रव्याच्या तेजानें दिपला, चमकला व मागेंपुढें करूं

लागला. तोंच त्याची पुढें वाट न पाहतां इंग्रजांनीं सावरकरांना ओढीत, ताणीत, ढकलीत बलात्कारानें स्टीमरवर चढविलें ! ते त्या त्काराचा प्रतिनाद करीत होते ! !

*    *    *    *    *

ती रात्र भयंकर होती ! त्या एवढ्याशा क्याबिनींत सर्व पोलिस उभे होते. बसावयास जागा नव्हती. दारावर एक नागवी तरवार ठेवलेली. कोणी ब्र काढील तर शपथ. आजुबाजूच्या सर्व क्याबिनी गलबताच्या सर्व भागांत सुखवस्तू प्रवासी चाललेले. तो भागच रि केला कारण ? पोलिस आपसांत सहेतुक त्या तरुण बंदीस ऐकूं जावें ध्वनीनें म्हणत " आज रातको सालेको बताएंगे ! " तर काय रात्रीं नाशिकला जो छळ झाला म्हणून आपण वाचलें तसलाच छळ हो काय ? आज मला तोंडांत बोळा देऊन हे मारहाण व छळ करणार ? ठी हें तर आम्हांस त्याच दिवशीं कळलें होतें कीं ज्या दिवशीं आम्हीं राष्ट्रोद्धाराचें व्रत उचललें होतें.

*    *    *    *    *

पण ह्या इतक्या साहसाचा काय परिणाम झाला ! सुटका म्हणावी झाली नाहीं. उलट पायांतील बेड्या अधिकच जड व कांटेरी झाल्या ! दुसरा उद्देश कीं युरोपमध्यें आपल्या कष्टानें हिंदुस्थानच्या आकांक्षांची राजकीय साहसाची व स्वातंत्र्य संपादनाच्या कठोर प्रतिज्ञेची प्रसि ( जाहिराती ) व्हावी तर तेंही फसलें कारण मार्सेलिसला आपण निसट ही बातमी जगांत चिटपाखराला सुद्धां कळणार नाहीं ! कोण कळवणार तथापि कर्मण्येवाधिकारस्ते ! कर्मण्येवाधिकारस्ते ! !

*    *    *    *    *

रात्र झाली. प्रतिक्षणीं सावरकर बघत होते कीं हे मारहाणीस केव्हां आरंभ करतात. थोड्याच वेळांत त्यांचा मुख्य इंग्लिश ऑफिसर अगदीं निरखून निजलेल्या सावरकरास न्याहाळीत उभा राहिला. व शेवटीं म्हणाला "क्या अवलाद है !" सावरकरांना डोळे उघडले. तेव्हां तो म्हणाला, "तुला शरम वाटत नाहीं !" सावरकर कांहीं उत्तरले नाहींत. तेव्हां आणखी चढून जाऊन इंग्लिशमधल्या दोन निवडक शिव्या हांसडल्या व आंगावर आलेसारखे करून हातवारे करीत म्हणाला, 'कीं काय करूं ? मी त्यावेळेस जागा नव्हतों नाहीं तर तुझ्या.........! हे अपशब्द ऐकतांच सावरकर उठून बसले व त्या आफिसरास गंभीर स्वरांत म्हणाले "हें पहा ! मी ज्यावेळेस ज्याला तुम्ही बंड म्हणतां तें उभारलें तेव्हां मी आपल्या घरास प्रथम आग लावून दिली व नंतर इतरांचीं घरें जाळावयास निघालों. मी जिवंतपणींच आतां मेलेला आहें. नंगा निर्भयपणा हा माझा एकच मित्र आहे. पण तुम्ही ? तुम्हांस बायकामुलें आहेत. तुम्हांस अजून जगावयाचें आहे. तेव्हां हें ध्यानांत धरा कीं, जर तुम्ही मला असे अपशब्द बोलाल, जर मारहाण कराल तर मी तर मरेनच पण तुम्हांपैकीं कोणा एकास घेऊन मरेन !" सावरकरांचे हे शब्द फोल नव्हते. त्या रात्रीं ज्या तुमानीच्या खिशांत तो पिस्तुल भरून ठेवी ती तुमान सहज विसरून वरच्याच खुंटीवर होती. सावरकरांनीं योजून ठेविलें होतें कीं, जर कदाचित मारहाण करूं लागले तर शक्य तर झटपट करून त्या तुमानींतलें तें पिस्तुल घ्यावयाचें व शक्य तर त्याचा निदानीं आपलाही अंत करून टाकावयाचा ! !

* * * * *

ते तशा भयंकर दृढतेचे व नंग्या निर्भयतेचे शब्द व्यर्थ गेले नाहींत. एकाएकीं तो अधिकारी नरम झाला, व कळवळून म्हणाला "मी शिवी बिवी कांहींएक देणार नाहीं. तुम्हींही असा कांहींही अविचार करूं नये. हें पहा मी तुम्हांस किती सभ्यपणानें वागविलें. पण तुम्ही माझ्यावर पेच

लागला. तोंच त्याची पुढें वाट न पाहतां इंग्रजांनीं सावरकरांना धरून ओढीत, ताणीत, ढकलीत बलात्कारानें स्टीमरवर चढविलें ! ते त्या बलात्काराचा प्रतिनाद करीत होते ! !

* * * * *

ती रात्र भयंकर होती ! त्या एवढ्याशा क्याबिनींत सर्व पोलिस कोंबून उभे होते. बसावयास जागा नव्हती. दारावर एक नागवी तरवार टांगत ठेवलेली. कोणी ब्र काढील तर शपथ. आजुबाजूच्या सर्व क्याबिनी सोडून गलबताच्या सर्व भागांत सुखवस्तू प्रवासी चाललेले. तो भागच रिकामा केला कारण ? पोलिस आपसांत सहेतुक त्या तरुण बंदीस ऐकूं जावें अशा ध्वनीनें म्हणत " आज रातको सालेको बताएंगे ! " तर काय आज रात्रीं नाशिकला जो छळ झाला म्हणून आपण वाचलें तसलाच छळ होणार काय ? आज मला तोंडांत बोळा देऊन हे मारहाण व छळ करणार ? ठीक ! हें तर आम्हांस त्याच दिवशीं कळलें होतें कीं ज्या दिवशीं आम्हीं हें राष्ट्रोद्धाराचें व्रत उचललें होतें.

* * * * *

पण ह्या इतक्या साहसाचा काय परिणाम झाला ! सुटका म्हणावी तर झाली नाहीं. उलट पायांतील बेड्या अधिकच जड व कांटेरी झाल्या ! बरें दुसरा उद्देश कीं युरोपमध्यें आपल्या कष्टानें हिंदुस्थानच्या आकांक्षांची व राजकीय साहसाची व स्वातंत्र्य संपादनाच्या कठोर प्रतिज्ञेची प्रसिद्धी ( जाहिराती ) व्हावी तर तेंही फसलें कारण मार्सेलिसला आपण निसटलों ही बातमी जगांत चिटपाखराला सुद्धां कळणार नाहीं ! कोण कळवणार ! तथापि कर्मण्येवाधिकारस्ते ! कर्मण्येवाधिकारस्ते ! !

* * * * *

रात्र झाली. प्रतिक्षणीं सावरकर बघत होते कीं हे मारहाणीस केव्हां आरंभ करतात. थोड्याच वेळांत त्यांचा मुख्य इंग्लिश ऑफिसर अगदीं नेरखून निजलेल्या सावरकरास न्याहाळीत उभा राहिला. व शेवटीं म्हणाला ' क्या अवलाद है ! " सावरकरांना डोळे· उघडले. तेव्हां तो म्हणाला, ' तुला शरम वाटत नाहीं ! " सावरकर कांहीं उत्तरले नाहींत. तेव्हां आणखी चढून जाऊन इंग्लिशमधल्या दोन निवडक शिव्या हांसडल्या व अंगावर आलेसारखे करून हातवारे करीत म्हणाला, ' कीं काय करूं ? मी यावेळेस जागा नव्हतों नाहीं तर तुझ्या.........! हे अपशब्द ऐकतांच सावरकर उठून बसले व त्या आफिसरास गंभीर स्वरांत म्हणाले " हें हा ! मी ज्यावेळेस ज्याला तुम्ही बंड म्हणतां तें उभारलें तेव्हां मी आपल्या घरास प्रथम आग लावून दिली व नंतर इतरांचीं घरें जाळावयास नेघालों. मी जिवंतपणींच आतां मेलेला आहें. नंगा निर्भयपणा हा माझा एकच मित्र आहे. पण तुम्ही ? तुम्हांस बायकामुलें आहेत. तुम्हांस अजून जगावयाचें आहे. तेव्हां हें ध्यानांत धरा कीं, जर तुम्ही मला असे अपशब्द बोलाल, जर मारहाण कराल तर मी तर मरेनच पण तुम्हांपैकीं कोणा एकास घेऊन मरेन ! " सावरकरांचे हे शब्द फोल नव्हते. त्या रात्रीं ज्या तुमानीच्या खिशांत तो पिस्तुल भरून ठेवी ती तुमान सहज विसरून वरच्याच खुंटीवर होती. सावरकरांनीं योजून ठेविलें होतें कीं, जर कदाचित मारहाण करूं लागले तर शक्य तर झटपट करून त्या तुमानींतलें तें पिस्तुल घ्यावयाचें व शक्य तर त्याचा निदानीं आपलाही अंत करून टाकावयाचा ! !

* * * * *

ते तशा भयंकर दृढतेचे व नंग्या निर्भयतेचे शब्द व्यर्थ गेले नाहींत. एकाएकीं तो अधिकारी नरम झाला, व कळवळून म्हणाला " मी शिवी बिवी कांहींएक देणार नाहीं. तुम्हींही असा कांहींही अविचार करूं नये. हे पहा मी तुम्हांस किती सभ्यपणानें वागविलें. पण तुम्ही माझ्यावर पेच

लागला. तोंच त्याची पुढें वाट न पाहतां इंग्रजांनीं सावरकरांना धरून ओढीत, ताणीत, ढकलीत बलात्कारानें स्टीमरवर चढविलें ! ते त्या बलात्काराचा प्रतिनाद करीत होते ! !

* * * * *

ती रात्र भयंकर होती ! त्या एवढ्याशा क्याबिनींत सर्व पोलिस कोंबून उभे होते. बसावयास जागा नव्हती. दारावर एक नागवी तरवार टांगत ठेवलेली. कोणी ब्र काढील तर शपथ. आजुबाजूच्या सर्व क्याबिनी सोडून गलबताच्या सर्व भागांत सुखवस्तू प्रवासी चाललेले. तो भागच रिकामा केला कारण ? पोलिस आपसांत सहेतुक त्या तरुण बंदीस ऐकूं जावें अशा ध्वनीनें म्हणत " आज रातको सालेको बताएंगे ! " तर काय आज रात्रीं नाशिकला जो छळ झाला म्हणून आपण वाचलें तसलाच छळ होणार काय? आज मला तोंडांत बोळा देऊन हे मारहाण व छळ करणार? ठीक! हें तर आम्हांस त्याच दिवशीं कळलें होतें कीं ज्या दिवशीं आम्हीं हें राष्ट्रोद्धाराचें व्रत उचललें होतें.

* * * * *

पण ह्या इतक्या साहसाचा काय परिणाम झाला ! सुटका म्हणावी तर झाली नाहीं. उलट पायांतील बेड्या अधिकच जड व कांटेरी झाल्या ! बरें दुसरा उद्देश कीं युरोपमध्यें आपल्या कष्टानें हिंदुस्थानच्या आकांक्षांची व राजकीय साहसाची व स्वातंत्र्य संपादनाच्या कठोर प्रतिज्ञेची प्रसिद्धी ( जाहिराती ) व्हावी तर तेंही फसलें कारण मार्सेलिसला आपण निसटलों ही बातमी जगांत चिटपाखराला सुद्धां कळणार नाहीं ! कोण कळवणार ! तथापि कर्मण्येवाधिकारस्ते ! कर्मण्येवाधिकारस्ते ! !

* * * * *

रात्र झाली. प्रतिक्षणीं सावरकर बघत होते कीं हे मारहाणीस केव्हां आरंभ करतात. थोड्याच वेळांत त्यांचा मुख्य इंग्लिश ऑफिसर अगदीं निरखून निजलेल्या सावरकरास न्याहाळीत उभा राहिला. व शेवटीं म्हणाला "क्या अवलाद है!" सावरकरांना डोळे उघडले. तेव्हां तो म्हणाला, "तुला शरम वाटत नाहीं!" सावरकर कांहीं उत्तरले नाहींत. तेव्हां आणखी चढून जाऊन इंग्लिशमधल्या दोन निवडक शिव्या हांसडल्या व आंगावर आलेसारखें करून हातवारे करीत म्हणाला, 'कीं काय करूं ? मी त्यावेळेस जागा नव्हतों नाहीं तर तुझ्या.........! हे अपशब्द ऐकतांच सावरकर उठून बसले व त्या आफिसरास गंभीर स्वरांत म्हणाले "हें पहा! मी ज्यावेळेस ज्याला तुम्ही बंड म्हणतां तें उभारलें तेव्हां मी आपल्या घरास प्रथम आग लावून दिली व नंतर इतरांचीं घरें जाळावयास निघालों. मी जिवंतपणींच आतां मेलेला आहें. नंगा निर्भयपणा हा माझा एकच मित्र आहे. पण तुम्ही ? तुम्हांस बायकामुलें आहेत. तुम्हांस अजून जगावयाचें आहे. तेव्हां हें ध्यानांत धरा कीं, जर तुम्ही मला असे अपशब्द बोलाल, जर मारहाण कराल तर मी तर मरेनच पण तुम्हांपैकीं कोणा एकास घेऊन मरेन!" सावरकरांचे हे शब्द फोल नव्हते. त्या रात्रीं ज्या तुमानीच्या खिशांत तो पिस्तुल भरून ठेवी ती तुमान सहज विसरून वरच्याच खुंटीवर होती. सावरकरांनीं योजून ठेविलें होतें कीं, जर कदाचित मारहाण करूं लागले तर शक्य तर झटपट करून त्या तुमानींतलें तें पिस्तुल घ्यावयाचें व शक्य तर त्याचा निदानीं आपलाही अंत करून टाकावयाचा!!

* * * * *

ते तशा भयंकर दृढतेचे व नंग्या निर्भयतेचे शब्द व्यर्थ गेले नाहींत. एकाएकीं तो अधिकारी नरम झाला, व कळवळून म्हणाला "मी शिवी बिवी कांहींएक देणार नाहीं. तुम्हींही असा कांहींही अविचार करूं नये. हें पहा मी तुम्हांस किती सभ्यपणानें वागविलें. पण तुम्ही माझ्यावर पेच

मारून माझे बायकापोरांचे तोंडची भाकर काढून घेतलीत. म्हणून कांहीं शब्द रागांत माझे मुखांतून निघून गेले" सावरकर म्हणाले, "तुम्ही म्हणतां तें एक प्रकारें खरें आहे. पण हें पहा, तुम्हांला बायकापोरें आहेत. तशीं मलाही नाहींत काय? मग जेव्हां हें वारंट घेऊन तुम्ही मला पकडलेंत व इतक्या बंदोबस्तानें व कठोर कौशल्यानें पहारा देत फांशीचे खांबाकडे चालविलेंत तेव्हां माझ्या बायकापोरांचें काय होईल याचा विचार तुम्हीं केला होतात काय? तुम्ही सभ्यपणानें वागतां तर मीही कांहीं असभ्यपणानें नागवा नाचत नाहीं. मीही सभ्य व गोड भाषेंतच बोलतों. पण आपली माझी ज्या परिस्थितींत गांठ पडली आहे त्या परिस्थितीचाच हा दोष आहे. तींत तुम्ही मला स्वतंत्र वावरूं न देतां जोंवर बांधून—करकचून बांधून—फांशीकडे नेता आहांत तोंवर शक्य तर तुमच्या हातांतून सुटून जाण्याचा मीही प्रयत्न करणारच. तेव्हां याविषयीं कोणी कोणावर जळफ्यांत अर्थ नाहीं. जर तुम्हास मला ठार मारावें हें कर्तव्य वाटतें, तर मला तुमचे हेतू निष्फळ करावे हें कर्तव्य वाटणारच.

* * * * *

झालें. मारहाणीच्या रंगांत एकसहा फरक झाला. ती तरवार अदृश्य झाली. पोलिसांची आपसांतील भाषणांत चालणारी शिवीगाळ ऐकूं येईनाशी झाली. मात्र बाकी बंदोबस्त इतका झाला कीं, श्वासोश्वास करणें कठीण वाटूं लागलें. लहान क्याबिनमध्यें सदा राहाणें व तेंही दोन विपक्षी माणसांसह. तेथेंच जेवण, तेथेंच लघ्वी, इतकेंच काय परसाकडेसही हातकडीसुद्धां एका मनुष्याच्या हातांत हात घालून बसणें. हातकडी जेवतांनाही अर्धीच निघे. सूर्यप्रकाश बघावयास मिळेना मग सूर्य दूरच! डॉक्टरला अर्ज केल्यानंतर क्याबिनचे समोर आठ नऊ पाऊलें उजेडांत चालावयाची अनुज्ञा मिळाली! ही बाह्य परिस्थिती आणि मनःस्थिती त्याहून ही भयंकर! आतां पुन्हां सुटकेची संधी सांपडणें पुन्हां किती—अशक्य आतां हिंदुस्था-

नांत जिवंत जाऊन विजेत्याच्या रथाच्या चाकाला बांधले जाऊन त्याच्या जयोत्सवास शोभा आणण्यापेक्षां आतां येथल्या येथें हा समुद्र उचंबळून माझ्या एकट्याच्या क्याबिनमध्यें शिरून मला अलगज नेऊन बुडवून टाकील तर किती उत्तम ! आत्महत्येचें जें कार्य धर्म करूं देत नाहीं ती प्रकृति येऊन स्वयंमेव करो ! पूर्वी सागरास विनंति केली होती.

ने मजशीं ने परत मातृभूमीला ! सागरा प्राण तळमळला ॥ व त्यानेंही ती ऐकली पण अशी ऐकिली कीं, तें वरदान शापाहून भयंकर व्हावें ! आतां मातृभूमीला परत ने म्हणून नव्हे तरः—

" दे साक्ष सिंधु ! ज्या काळा रे !
वाहसी मज तमःपुरिला ( त्या )
प्रत्येक तुझ्या कल्लोळा ( तै )
विनविलें न कां । उघडुनि मुखा ।
ज्या घेऊं न दे धर्म दे तया मरणा ॥





वे
ज्या

# प्रकरण ७ वें.

## जन्मभूमींत आगमन पण दोन जन्मठेपींची शिक्षा

आतां मातृभूमीस पाय लागला पण तो सशस्त्र नागव्या तरवारी घेऊन शिडीच्या पायरीपायरीवर उभ्या राहिलेल्या गोऱ्या सैनिकांचे रांगेंतून ! मुंबई-हून त्वरित त्यांस नाशिकला स्पेशल ट्रेननें नेण्यांत आलें. डब्यांचे, मोटारीचे, घराचे सर्व दरवाजे बंद ! बरोबर एक धिप्पाड आफिसर होता त्याचे हातांत एक हातकडी व तिची दुसरी कडी सावरकराचे हातांत अडकविलेली. लघवीस व शौचास देखील त्याचेबरोबर त्याच स्थितींत जाणें ! नाशिकला येतांच त्यांस काढणी घालून म्हणजे दंडामागें दोऱ्या बांधून त्या बैलाच्या वेसणीप्रमाणें धरून हातांत हातकडी व पायांत बेड्या ठोकून पोलिसाचे चौकीपुढील मार्गावर फिरविण्यांत आलें. पण इतक्या सर्व खटाटोपामधूनही छिद्र पाडून सावरकरांचे हातांत एक इंग्लिश पत्र पडलें. त्यांत तार होती कीं, फ्रान्सनें सावरकरांस परत देण्याविषयीं इंग्लंडकडे मागणी केली आहे ! व जगभर त्याविषयाची चर्चा चालली आहे ! ! !

* * * * *

तर मग मार्सेलिसचें साहस पूर्णपणें वायां गेलें नाहीं. एक उद्दिष्ट तर सफळ झालें कीं, युरोपभर हिंदुस्थानच्या आकांक्षेचा दुंदुभी वाजूं लागली. डेली न्यूज व तत्सम इंग्रजी पत्रांनीं स्वतःच लिहिलें कीं, इटलींतील राज्यक्रांति-कारक म्याझिनी व ग्यॉरीबाल्डी ह्यांच्यावरील आरोपास न जुमानतां इंग्लंडनें त्यांस आश्रयस्थान दिलें तर ते त्याच्याचप्रमाणें स्वदेशस्वातंत्र्यार्थ झगड-णाऱ्या सावरकरांसही फ्रान्समधें कां मिळूं नये ! यूरोप, अमेरिका, चीन, आशियन व आयरिश पत्रांत तर सावरकर यांची तुलना म्याझिनी, कोसूथ

ग्यारीबाल्डी यांच्याशीं उघड उघड करण्यांत येऊं लागली व त्याबरोबरच हिंदी स्वराज्याच्या चळवळीसही महत्त्व प्राप्त होऊन तिच्याकडे जगाचें लक्ष कधींच वेधलें नव्हतें असें वेधूं लागलें. डेली न्यूजचा वरील कट (cuttings) व इतर कांहीं युरोपीय पत्रांचे उतारे सावरकर यांस नाशिककडून येरोड्यास आणतांना मिळाले. तेव्हां क्षणभर चित्तास आनंद झाला. पण तोंच मनांत वाटलें कीं, पराजयाचें दुःख टाळण्यास मी कर्मण्येवाधिकारस्ते या वचनानें समाधान करून घेतलें होतें, जर कर्मण्येवाधिकारस्ते या तत्त्वानें निष्फळतेच्या दुःखास तुझा अधिकार नाहीं तर आज अंशिक सफलतेच्या आनंदावरही तुझा काय हक्क ?

* * * * *

मार्सेलिसला घडलेली हकीकत कशी काय बाहेर फुटली याविषयीं इंग्रजी अधिकाऱ्यांना अत्यंत आश्चर्य वाटलें. त्यांनीं इतर माहिती मिळविण्यासाठीं जसा सावरकरांपाठीमागें ससेमिरा लावला तसाच मार्सेलिसहून प्यारिसला तुम्ही पळाल्याची तार कोणी केली याविषयींही विचारून थकविलें. कोणी कां होईना पण मार्सेलिसला सावरकरांस पकडल्याची तार प्यारिसला देतांच प्रथमतः तो विषय " ला ह्युमॅनिटी " या नांवाच्या पत्रानें हातीं घेतला--हें पत्र जगांतील कम्युनिस्ट सोशियालिस्टांचें जें बायबल समजलें जातें त्या ' क्यापिटल ' या नांवाच्या अर्थशास्त्रीय ग्रंथाचा कर्ता कार्ल मार्क्स या प्रख्यात पुरुषाचा नातू चालवीत असे. त्यांत सावरकरांविषयीं नेहमींच आदर वाटत असल्यानें त्यांच्या वर्चस्वी पत्रानें तो विषय सारखा उचलून धरला. फ्रेंच सिनेटमध्यें खळबळ आरंभली गेली. इंग्लंडचें व फ्रान्सचें या विषयावर वितुष्ट पडतें कीं काय असा धाक पडतांच अंतीं तें सर्व प्रकरण आंतरराष्ट्रीय न्यायालयाच्या पंचासमोर हेगला सोंपविण्यांत आलें. सर्व प्रमुख राष्ट्रांतील लोकांचें लक्ष त्या कोर्टांत काय निकाल होतो तिकडे लागून त्यांचे प्रतिनिधीही तेथें आले होते. तेथें हिंदी क्रांतिकारकही जमले व आलेल्या

अनेक राष्ट्रांच्या पुढाऱ्यांच्या गांठी घेत हिंदुस्थानचे स्वातंत्र्याचा प्रश्न व स्वदेशाच्या चाललेल्या छळांचा व दुर्दशेचा पाठ वाचीत होते. अशा रीतीनें जगाच्या अत्युच्च न्यायासनासमोर आंतरराष्ट्रीय प्रश्न म्हणून सर्व प्रमुख देशचे प्रतिनिधी या एका हिंदी तरुणांस कोठें ठेवावें या प्रश्नाचा खल करीत होते. जगाच्या अत्युच्च आंतरराष्ट्रीय न्यायालयांत हिंदुस्थानचा राजकीय निर्देश व प्रवेश प्रथमतः सावरकरांच्या साहसानेंच झाला.

* * * * *

इकडे हिंदुस्थानांतही त्याचे आधींच असे खटले चालविण्यासाठीं व त्याचा झटकाफटकीं निकाल देण्यासाठीं एक ' स्पेशल ट्रिब्युनल ' नांवाचा कायदा पास करावा लागला. या कायद्यान्वयें ज्यूरिविना, अपिलाविना सरकार नेमील त्या तीन जज्जांना कटवाल्यांस मरणापर्यंत शिक्षा देण्याचा हक्क दिलेला होता.

* * * * *

इतकी कडेकोट सिद्धता केली व इंग्लंड, फ्रान्स व हिंदुस्थानचे पोलिसास सळो का पळो झालें. जगांतील मोठमोठ्या न्यायाधीशापर्यंत व जगांतलि अत्युच्च कोर्टापर्यंत भांडत बसतां बसतां हिंदुस्थानसरकारचे व विलायत-सरकारचे नाकीं--नव आले, नवे नवे कायदे केले, लाखों रुपये उधळले तेव्हां कोठें हा पंचवीस वर्षांचा एक मराठा क्रांतिकारक, सरकारास कोठडींत नेऊन कोंबतां आला.

फार दिवस गाजत असलेला नाशिकच्या कटाचा खटला, कीं ज्यांत सावरकर हे मुख्य आरोपी आहेत व म्हणूनच ज्याकडे जगांतील सर्व राष्ट्रें उत्सुकतेनें पहात आहेत तो आज मुंबई हायकोर्टात आरंभला. जिकडे तिकडे सशस्त्र घोडेस्वारांचा थयथयाट चाललेला होता. कोर्टात कटाचे इतर आरोपी आणून बसविले. त्यांच्यांत केवळ सावरकरांशीं संबंध असल्यानेंच कित्येक या संकटांत सांपडले होते. त्यांतील प्रत्येकाच्या पोलीस

कानीं कपाळीं ओरडत होते कीं तुमचा नाश या नष्ट सावरकरांचे पायीं झाला. अजून तरी त्या चांडाळाचें नांव काढणें सोडून द्या व त्याचे विरुद्ध काय माहीत असेल तें सांगून मोकळे व्हा ! कोर्टांत केवळ निवडक वकील मंडळ सोडून चिटपाखरूंही फडकूं दिलें नव्हतें. बाहेर मार्गीमार्गीनीं उघडपणें जमणें अशक्य असल्यानें थव्याथव्यांनीं, खिडक्या खिडक्यांतून, घरांदारांतून लोक सावरकरांच्या येण्याची मार्गप्रतीक्षा करीत होते. तोंच अत्यंत कडे-कोट बंदोबस्तांत मागेंपुढें सशस्त्र घोडेस्वारांचे पहाऱ्यांत सावरकरांची गाडी कोर्टापुढें आली. त्यांस हातकडी ठोकून दोघांनीं धरून वर नेलें. कोर्टाचे बंगल्यांत पाय टाकतांच नीट आरोपी लोकांच्या डांकमध्यें नेलें. तों एकसहा टाळ्यांचा कडकडाट झाला ! सावरकर दचकून वर पहातात तों ग्यालरींत तर कोणी नाहीं ! खालीं पहातात तों सर्व आरोपींचीं वदनें मागें मुरडलेलीं, दृष्टि आपल्याकडे अत्यंत उत्सुक आदरानें लागलेली ! तर मग ह्यांनीं टाळ्यांनीं माझें स्वागत केलें ! !

* * * * *

जेव्हां स्वतःचे गळ्यांत फुलांच्या माळा पडत होत्या व हजारों लोक जयजयकार करीत दूध बत्तासे व मिठाई पुरस्कार देत लोटत होते तेव्हां अनेक अनुयायांनीं माझें भक्तिपुरःसर टाळ्यांनीं स्वागत केलेलें होतें. पण तें सहाजिक होतें. आज माझे हातांत हातकड्या असतांनां, माझे शब्दावर विश्वास ठेवल्यानें व माझ्याशीं संबंध राखल्यानें ज्यांचे हातांत बेड्या पडल्या, ज्यांच्या घरादारांची राखरांगोळी झाली व ज्यांना मजहूनही अघोर शरीर-छळ सोसावा लागला त्यांनीं आज माझें जें हें स्वागत केलें तें मात्र असा-हाजिक, असाधारण होय ! जगांत पुष्कळ मान मिळतात. शहरांतून हजारों लोकांचे थवे मिरवितात, पण जेव्हां हातकड्या पडलेल्यांचे स्वागतार्थ त्यांच्यासाठींच हातकड्या पडलेले लोक त्या बद्ध हातांनींच टाळ्या वाज-वितात तेव्हां त्या क्षीणध्वनींत जो सन्मान असतो तो सत्कार मात्र धन्य होय !

* * * * *

खटल्याचा वृत्तांत तर राहोच पण त्यांतील अनेक विनोदी, उत्साही, करुणामय, भयंकर, महत्वपूर्ण व गंभीरतम असे निवडक प्रसंगही सांगणें स्थलाभावामुळें अशक्य आहे. इतकेंच सांगितलें पाहिजे कीं, सावरकरांनीं ब्रिटिश कोर्टाचा आपल्यावर अधिकार चालूं शकत नाहीं व म्हणून मी कोर्टांत भाग घेत नाहीं म्हणून कळविलें. १२१ च्या भयंकर अपराधा-विषयीं चौकशी असतांहीं धिःकारपूर्वक ब्रिटिश न्यायकोर्टाचा अधिकार न जुमानणारा हा हिंदुस्थानांतील पहिलाच आरोपी होय.

* * * * *

आजची मिती १९१० च्या डिसेंबरची तारीख २३. आज कोर्ट दीड दोन महिने अव्याहत चालत असलेल्या ह्या असाधारण खटल्यांचा निर्णय सांग-णार! आरोपींमध्यें चर्चा चाललेली आहे. कोणास काय पारितोषिक मिळणार? ज्यांस जितकीं वर्षे काळेंपाणी मिळेल म्हणून सावरकर तर्क सांगत होते त्यांचे त्याप्रमाणें विनोदांत क्रमांक ( नंबर ) लागत होते. जो सगळ्यांत जास्ती शिक्षेस पात्र होण्याचा संभव त्याचा पहिला क्रमांक. त्याहून कमी त्याचा दुसरा--तिसरा--चवथा आजपर्यंत " धर्मार्थ देह वदलों " त्याची आज परीक्षा आहे. बघूं कोण कोण उतरतें म्हणून परस्पर विनोद चालला आहे इतक्यांत जज्ज आल्याची गंभीर सूचना झाली. लांबलचक निर्णयपत्र वाचून अखेर तीनही भयंकर अपराध सिद्ध झाल्याचें जज्जांनीं सावरकरांस हांक मारून सांगितलें " तुम्हाला फांशींच व्हावयाची पण आम्ही आजन्म काळेपाण्याची शिक्षा सांगतों ! ! " सावरकर अर्धे उठले, नतशीर्ष करून गंभीर स्वरानें त्या शिक्षेचा स्वीकार करीत म्हणाले " वंदे मातरम् !"

* * * * *

एकामागें एकास पुकारून भयंकर शिक्षांची खिरापत वाटली जात आहे. खटल्यांतील अनेक आरोपांपैकीं त्या लोकांवर एक आरोप हाही होता कीं, ते नेहमीं " स्वातंत्र्य लक्ष्मी " चा जयजयकार करीत वास्तविक. सर्व आरोप

एकाच आरोपांचीं रूपांतरें--परिणाम होते म्हटलें तरी चालेल. सर्वांस १४ वर्षे १० वर्षे ३ वर्षे इत्यादि कठोर शिक्षा कठोरपणें सांगून निकाल संपविला. जज्ज मोठ्या समारंभानें अखेर यांची खोड मोडली असें समजून परत जावयास निघाले; तोंच हे कठोर शिक्षा झालेले सर्व तरुण एकसहा उभे राहिले व त्याच शब्दांत गर्जून उठले "स्वातंत्र्य लक्ष्मीकी जय !" "श्री स्वातंत्र्य लक्ष्मी की जय !"

* * * * *

जज्ज चपापले. परत फिरले. पोलिसांचे अधिकारी चहूंकडून धांवले. त्यांचा मुख्य चवताळून ओरडूं लागला, "अब कैदी है, बेतसे मारो !!" प्रथम सावरकरांस धरून खालीं नेण्यांत आलें. जातांना टोपी काढून, दुरून त्यांनीं मागें राहिलेल्या स्वजनांस, सहकाऱ्यांस व आपल्या लहान भावास कीं, ज्यालाहि शिक्षा लागली होती त्याला प्रेमानें व दुःखानें निरोप देत पुढें ओढणाऱ्या पोलिसांमागून गेले. "आतां पुन्हां या स्वजनांस, या धाकट्या भावास या जगास—मी कसा भेटणार !!" असा विचार त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्टपणें उमटला होता !

* * * * *

परंतु जन्मठेपीच्या एका शिक्षेनें सरकारचें समाधान झालें नाहीं. त्याच पुराव्यावर परंतु निराळ्या कलमाखालीं खुनास चिथावणी व सहाय्य केल्याच्या आरोपावरून सावरकरांवर लगेच दुसरा खटला भरण्यांत आला. ही बातमी ऐकतांच बहुतेकांस असें वाटणें साहजिक होतें कीं, बहुधा पहिल्या खटल्यांत सावरकरांस फांशीची शिक्षा झाली नाहीं म्हणून दुसरा खटला भरला असावा. आतां यांतही जर त्यांनीं भाग घेतला नाहीं व आपला बचाव केला नाहीं तर त्यांस फांशी होणारच होणार ! कित्येकांनीं तर निनांवी तारा धाडून सावरकरांस कळविलें कीं, आपण खटल्यांत भाग घेऊन आतां तरी बचाव करावा. परंतु हेग कान्फरन्समधील निर्णय लागला नसल्यानें सावरकरांनीं पुन्हांही भाग घेण्याचें व खटल्यांत बचाव करण्याचें नाकारलें. सर्व एकपक्षी चवकशी

झाली. निर्णयाच्या दिवशीं फांशीची शिक्षा ऐकण्याच्या सिद्धतेनें सावरकर कोर्टांत गेले. बहुतेक पोलिसांचीही अटकळ तीच होती.

*    *    *    *    *

पण काय झालें असेल तें असो; न्यायाधिशांनीं पुन्हां आणखी जन्मठेपीची शिक्षाच दिली पण फांशी नाहीं ! कचित् मार्सेलिसच्या साहसाचे हे उपकार असावेत. कचित् ५० वर्षांच्या जन्मठेपीची अघोर शिक्षा फांशीहूनही कांहीं अंशीं असह्यतर असल्यानेंही फांशी अनवश्यक दिसली असावी. निदान सावकरांस तरी ५० वर्षें शिक्षा ऐकतांच फांशीप्रमाणेंच ती भयंकर वाटली. पण "बुध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें ! ! ', ही दुसरी शिक्षा होतांच ते शांतपणें उठून गंभीर स्वरांत म्हणाले:—"I am prepared to face ungrudgingly the extrem penall of your laws in the belief that it is through suffering and sacrifice alone that our beloved motherland can march on to an assured, if not a speedy, triumph !"

*    *    *    *    *

"तप आणि बलिदान ह्यांच्या योगानेंच आपली प्रिय मातृभूमि द्रुत नसली तरी निश्चित विजय अंतीं वरणारी आहे हीच माझी निष्ठा असल्यानें मी तुमच्या कायद्यांतील या अत्यंत कठोर शिक्षेलाहि तोंड देण्यास सज्जच आहें."

*    *    *    *    *

तथापि हेग कान्फरन्समधील खटला फ्रान्स जिंकून सावरकरांस सोडवून नेईल अशी अजून पुष्कळांस आशा होती सावरकरांस मात्र अगदीं नव्हतीच म्हटलें तरी चालेल ! मार्च १९११ चे जवळ जवळ एक दिवशीं तुरुंगावरील अधिकाऱ्यांनीं येऊन सावरकरांस कोठडीबाहेर बोलावलें. कैद्याचे कपडे पुढें केले व सांगितलें कीं, हे घाला. हेग कान्फरन्सचा निर्णय तुमचे विरुद्ध झालेला असून तुम्ही आतां इंग्लिशांचे बंदी आहांत. तुम्हांस ५० वर्षें जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा ठोठावण्यांत आली आहे !

# शेवटीं.

झालें त्यांनीं १९११ सालीं जे हे बंदीचे कपडे घातले ते १९२४ ला पुन्हां उतरले, वास्तविक ते धरले गेले तेव्हांपासून म्हणजे १९१० च्या मार्च पासून तो १९२४ च्या जानेवारीपर्यंत ते बंदी शाळेच्या अत्यंत कठोर व तीक्ष्ण जबड्यांत गिळंकृत झालेले होते. त्यास गिळून टाकतांच कारागारानें आपल्या अंदमानच्या उदरांतील जाळत्या जठराग्नींत पचवून जिरवून नाहींसें करण्याचा कसून प्रयत्न केला. त्या जठराग्नींत असे अनेक तरुण चिरून पिसून पचून भस्म होऊन गेले होते. पण सावरकरांनीं त्या जठराग्नींसच उलटें पचवून टाकलें.अखेर त्या कारागाराचें जठर फाडून ते बाहेर आले.अनेक वेळेला अगदीं अत्यवस्थ स्थिती झाली. निराशेच्या कड्यावर उभे असतांना अथवा रुग्णशय्येच्या अंथरुणावर पडले असतांना मृत्यूच्या मुखाच्या गर्तेत कोसळण्यास एक पाय काय तो पुढें पडावयाचा होता. पण तो पडला नाहीं, व सावरकर १९२४ च्या जानेवारीला सुटून परत आपल्या स्वजनांत आले.

* * * * *

या चवदा वर्षांत त्यांनीं काय काय आपत्ती सहन केल्या तें काय सांगावें ? ज्या मनुष्यास एक वर्ष शिक्षा आहे तो मनुष्य एकच वर्ष शिक्षा भोगतो. ज्याला चौदा वर्षें आहेत तो चौदाच वर्षें शिक्षा भोगतो. पण ज्याला पन्नास वर्षें व तेंही जन्मठेप काळेपाणी म्हणजे ज्यांतून सुटेनच असा मुळींच निश्चय करतां येत नाहीं—नाहीं सुटणार हेंच कायतें निश्चयानें सांगतां येतें--अशी अनिश्चित भयंकर शिक्षा असते त्याच्या मनाची यातना भोगलेल्या वर्षांनीं गणली जात नसून त्यामध्यें बहुधा कधींही सुटणें नाहीं या अनिश्चित भयंकर हताशेचीही भर पडली असल्यानें त्याचीं चौदा वर्षें जवळ जवळ पन्नास वर्षें भरण्याइतकींच यातनामय असतात.

* * * * *

आणि त्यांतही एकाच्या दुःखाचाच बोजा उचलावयाचा असता तरीही थोडें हलकें गेलें असतें. त्यांच्यासमोर त्यांच्यासारख्याच—किंबहुना त्यांच्याहूनही कठोर हालांत व अपेष्टेंत झिजत असलेले त्यांचे बंधु गणेशपंतही जन्मठेपीची शिक्षा भरीत होते. ह्या उभयतां बंधूंस परस्परांचे कष्ट, अपमान व छळ पाहून दुःखाचा द्विगुणित भार सहन करावा लागे !

* * * * *

ह्या प्रकरणाचे शेवटच्या भागांत कांहीं गोष्टींचा अगदीं ओझरता उल्लेख करणें प्राप्त आहे. विनायकराव विलायतेंत--त्यांच्यावरही वॉरंट सुटलें होतें. दे. भ. गणेशपंत ह्यांना तर जन्मठेपीची शिक्षा झाली-- डॉ. बाळ ह्यांनाही त्यांच्यावर आलेल्या आरोपाबद्दल सहामहिन्यांची सजा मिळालेली. सावरकर कुटुंबाला आश्रय देणें हें त्या वेळीं अखिल महाराष्ट्रांत सरकारी दृष्टीनें पाप मानलें जात होतें. मग नाशकास तरी दुसरी परिस्थिती कशी असणार ? विनायकरावांचे श्वशुर श्री. भाऊसाहेब चिपळूणकर ह्यांनीं आपल्या जांवयामुळें ओढवलेल्या आपत्तींना मोठ्या प्रेमानें तोंड दिलें. आपल्या मुलीचा सांभाळ सरकारी त्रासाला कःपदार्थ मानून त्यांनीं त्या काळांत मातेपेक्षांही अधिक ममतेनें केला. पण दे. भ. गणेशपंतांच्या बायकोचे मात्र फार हाल झाले. उभ्या नाशिक शहरांत तिला राहायला जागा मिळेनाः—माहेर तें तर लांबच राहिलें मग मामाचा आश्रय कसा मिळावा ? मॅडम कामा ह्या कांहीं पैसे पाठवीत म्हणून पोटाची काळजी तरी सुटली ! पण त्या माउलीला केवळ जागेच्या अभावीं एका देवळाचा आश्रय करावा लागला ! ही स्थिती डॉ. बाळ सुटेपर्यंतच होती. नंतर पतिविरहानें—त्यांचा तुरुंगांत होणारा छळ ऐकून त्या काळजीनेंच त्या झुरत होत्या. गणेशपंत तुरुंगांत गेल्यानंतर पुष्कळ वर्षेपर्यंत परवानगीचे खेळ चालत होते. परन्तु दैवयोग असा विलक्षण कीं, ज्या दिवशीं डॉ. सावरकर ह्यांना आपल्या उभयतां बंधूंना त्यांच्या कुटुंबासह भेटण्याची परवानगी आली त्याच दिवशीं त्यांचा अंत झालेला होता ! ! धन्य ती माउली ! ! !

* * * * *

विलायतेंत जाऊन बॅरिस्टरीची परीक्षा पास झालेला मनुष्य इंग्लिश सरकारच्या हिंदुस्थानांतल्या बंदिवासांत कशा प्रकारें वागविला जातो ह्याचें हृदयद्रावक चित्र आपल्या मनःश्चक्षुंसमोर उभें केलें असतां अंतःकरण खळबळल्याशिवाय राहात नाहीं. बॅ. सावरकर हे एक प्रतिष्ठित राजकीय कैदी होते. असें असतां त्यांना घाण्याला बांधून तेल काढायला लावणें त्यापेक्षां दुसरी दुर्दैवाची गोष्ट कोणती ? ब्रिटिश राज्यकर्ते स्वतः स्वातंत्र्यप्रेमी आहेत पण ते असे अप्पलपोटे आहेत कीं, दुसऱ्यानें मागितलेलें स्वातंत्र्य त्यांना खपत नाहीं. स्वराष्ट्र स्वतंत्र असावें ही इच्छा वाईट काय ? बॅ. सावरकर ह्यांच्यासारख्या राजकीय कैद्याला घाण्याला डांबून तेल काढणें, काथ्या खोलायला लावणें ह्यासारखीं अगदीं बेरड बदमाषाला शोभतील अशीं कामें देण्यांत आलीं. ह्यावरून त्यांच्या इतर झालेल्या हालांची कल्पनाच करणें बरें.

* * * * *

पण तो सर्व त्यांनीं सोसला. त्या हृदयद्रावक प्रसंग या संक्षिप्त चरित्रांत सांगणें अशक्य आहे. इतकें सांगणें मात्र अवश्य आहे कीं, सावरकरांनीं तुरुंगांत सोसलेल्या हालअपेष्टेचा वृत्तांत जसा अद्याप महाराष्ट्रास कळावयाचा आहे तसाच त्यांनीं तुरुंगांतही देशसेवेचें कार्य क्षणभर न सोडतां जे जे प्रयत्न केले त्यांचीही माहिती अजून त्यांचे देशबांधवांना होणें आहे. ही माहिती जेव्हां केव्हां होईल तेव्हां त्यांच्या विषयीं असलेली समाजाचे मनांतील पूज्यबुद्धि व कृतज्ञता हीं द्विगुणित होतील. तुरुंगांतही त्यांनीं हजारों अशिक्षित लोकांस लिहावयास व वाचावयास शिकविलें. शेंकडो शिक्षित लोकांस युनिव्हर्सिटीप्रमाणें अनेक विषयांत " विशारद " करून सोडलें. हिंदुधर्माचे विरुद्ध तुरुंगांतून अनेक मुसलमान लोक झटत असतात व हिंदुंस बाटवून मुसलमानी धर्माची दीक्षा देतात. त्यांचा आज उभीं दहा वर्षे ते प्रतिकार करीत असून शेंकडों—अक्षरशः—शेंकडो मुसलमानांस पुन्हां शुद्ध करून त्यांनीं हिंदु केलेलें आहे. या उद्योगांत कित्येकदां त्यांच्या अंगावर बदमाष मुसलमानांनीं

चालही केलेली होती. गणेशपंतांस दुखापतही झाली होती. पण ह्या सर्व धमक्यांस न जुमानतां त्यांनीं आपलें कार्य अखंड चालविलें होतें. आतां नुकतेंच रत्नागिरीचे तुरुंगांत असतांही एका सिंधी बदमाष मुसलमानाचे कचाटींतून एका बाटलेल्या मनुष्यास सोडवून त्यास पुन्हां हिंदु करून घेतल्यामुळें तेथील सिंधी मुसलमानांनीं सावरकरांचा घात करण्याची धमकी त्यांस दिली होती व एकदां एक सिंधी तर त्यांवर तुटूनसुद्धां पडला. पण अगदीं सुटावयाचे दिवसापर्यंत ते तुरुंगांतील कुठेंही व कोणाही हिंदूवर धार्मिक अन्याय होत असतां शक्य त्या उपायानें त्याचा प्रतिकार करीत असत. तुरुंगांतून त्यांनीं विद्येची अभिरुचि बंदीजनांत इतकी वाढविली कीं, अंदमानच्या तुरुंगांतसुद्धां एकदां शेंकडा ७३ लोक तेथें ज्या. सावरकरांच्या प्रेरणेनें व श्रमानें शिक्षित झाल्याचें जेलरनें मान्य केलें होतें. व आतां रत्नागिरीचे तुरुंगांतही वार्षिक रिपोर्टांत बंदीजनांची शिक्षणप्रियता वाढल्यानें तुरुंगांतील गु[illegible] कमी झाले असें अधिकाऱ्यांनीं मान्य केलें. त्यांच्या दहा वर्षांच्या निवासानें अंदमानच्या राष्ट्रीय वातावरणाचें तर रूपच्यारूप बदलून गेलें. ह्या त्रोटक उल्लेखांपेक्षां त्यांच्या कारागारांतील अनुभवांचा वृतांत विस्तारशः देणें अशक्य आहे. तो वृत्तांत स्वतः सावरकरच महाराष्ट्र जनतेस स्वमुखानें सांगतील तेव्हां खरें तेथपर्यंत या अल्प चरित्रावरच महाराष्ट्र जनतेला संतुष्ट राहिलें पाहिजे. परमेश्वरा ! श्रीयुत बॅ. विनायकराव सावरकर ह्यांना त्यांना देशकार्य करायला दीर्घायुषी कर ! ! !

## समाप्त.

## सागरास:—

ने मजसी ने परत मातृभूमीला । सागरा प्राण तळमळला ॥ ध्रु ॥
भूमातेच्या चरणतला तूं धूतां । मी नित्य पाहिला होता ।
मज वदलासी अन्य देशीं चल जाऊं । सृष्टिची विविधता पाहूं ।
तैं जननी हृद्‌विरह शंकितहि झालें । परि तुवां वचन तिज दिधलें ।
मार्गज्ञ स्वयें मीच पृष्ठिंवाहीन । त्वरित या परत आणीन ।

चालः—

गंभीर त्वदाकृति बघुनी ॥ मी
विश्वसलों या तव वचनीं ॥ मी
जगदनुभव योगें बनुनी ॥ मी

येईन त्वरें कथुनि सोडिलें तिजला । सागरा प्राण तळमळला ॥ २ ॥
शुकपंजरिं कीं हरिण शिरावा पाशीं । ही फसगत झाली तैशी ।
भूविरह कसा सतत साहुं या पुढतीं । दशदिशा तमोमय होती ।
गुणसुमनें मी वेंचियलीं या भावें । कीं तिनें सुगंधा घ्यावें ।
जरि उद्धरणीं व्यय न तिच्या हो साचा । हा व्यर्थ भार विद्येचा ।

चालः—

ती आम्रवृक्ष वत्सलता ॥ रे ॥
नव कुसुमयुता त्या सुलता ॥ रे ॥
तो बाल गुलाबहि आतां ॥ रे ॥

फुलबाग मला हाय पारखा झाला । सागरा प्राण तळमळला ॥ ३ ॥
नभिं नक्षत्रें बहुत एक परि प्यारा । मज भूमिचा तारा ।
प्रासाद तिथें रम्य परी मज भारी । माझी झोंपडी प्यारी ।
तिजवीण नको राज्य मज प्रियसाचा । वनवास तिच्या जरि वनिचा ।

चालः—

भुलविणें व्यर्थ हें आतां ॥ रे ॥
बहु जिवलग गमतें चित्ता ॥ रे ॥
तुज सरित्पते जी सरिता ॥ रे ॥

तद्विरहाची शपथ घालितों तुजला । सागरा प्राण तळमळला ।
या फेनमिषें हंससि निर्दया कैसा । कां वचन भंगिसी ऐसा ।
त्वत्स्वामित्वा संप्रति जी मिरवीते । भिउनि कां आंग्लभूमितें ।
मन्मातेला अबल म्हणुनि फसवीसी । मज विवासनेतें नेसी ।

चालः—

जरि आंग्ल भूमि भयभीता ॥ रे ॥
अबला न माझी ही माता ॥ रे ॥
कथिल हें अगस्तिस आतां ॥ रे ॥

जो आचमनीं एकक्षणीं तुज प्याला । सागरा प्राण तळमळला ॥ ५ ॥







# स्वातंत्र्यवीर विनायकराव सावरकर
# ह्यांचें संक्षिप्त चरित्र.

लेखक,
सदाशिव राजाराम रानडे.

प्रस्तावनाकार,
दे. भ. नरसिंह चिंतामण केळकर,
बी. ए. एलएल., बी. संपादक 'केसरी'.



आवृत्ति पहिली.

सन १९२४.

लोकमान्य छापखाना मुंबई.

किंमत आठ आणे.

# प्रस्तावना.

श्री. विनायकराव सावरकर यांचें चरित्र त्यांच्या हयातींत लिहिलें जाईल असें मला वाटलें नव्हतें. परंतु तें लिहून आज छापलेंहि जात आहे, इतकेंच नव्हे तर त्याची प्रस्तावना लिहिण्याविषयीं मला विनंति करण्यांत येत आहे हें मी आश्चर्यांतलें आश्चर्य मानतों. चरित्रकारांनीं देऊं केलेला हा मान नाकारणें हें मला जड कां वाटलें, व दुसरेपक्षीं प्रस्तावना लिहिणें हेंहि जड कां वाटतें, याचीं कारणें मी सांगत बसत नाहीं. सावरकरांचीं व माझीं कांहीं कांहीं मतें न जुळण्यासारखीं त्यांची व माझी मनोरचना आहे, हें मला माहीत आहे. पण तीं जुळतात वा न जुळतात हें संभाषणांत पडताळून पाहण्यासारखा त्यांचा माझा प्रत्यक्ष संबंध ते तुरुंगांतून सुटण्यापूर्वी कधींच आला नव्हता. माझी आठवण बरोबर असेल तर मला असें वाटतें कीं, १९०७ सालीं सार्वजनिक सभेंत भरलेल्या ज्या एका जाहीर सभेचा मी अध्यक्ष होतों त्या सभेंत सावरकर हे एक वक्ते होते; व सभेंतून परत जातांना त्यांच्या तेजस्वी वक्तृत्वाची वाखाणणी मीं मनांत करीत असतां, परदेशी कपड्यांची होळी करण्यासारख्या कृत्याविरुद्ध मी बोललों याबद्दल ते मला मनांतून नांवें ठेवीत परत जात असावे. सावरकर व मी यांचें प्रत्यक्ष भाषण असें सर्व जन्मांत ते परवां तुरुंगांतून सुटून रत्नागिरीस जात असतां मुद्दाम मला भेटण्याकरितां माझे घरीं आले त्यावेळींच प्रथम झालें; व हे सावरकर असें त्यांना मी आजपर्यंत प्रत्यक्ष दुसऱ्यांनदां याच वेळीं पाहिलें !

पण सावरकरांशीं माझें पूर्वी प्रत्यक्ष भेटणें बोलणें झालें नसलें तरी त्यांची कीर्ति मी ऐकलीच होती; व त्यांचीं माझीं मतें जुळणारीं नसलीं तरी त्यांच्या धाडसी बाणेदार स्वभावाचें कौतुक करणारांपैकींच मीही एक होतों. त्यांच्या देशभक्तीचा थाट आयरिश देशभक्तांच्या देशभक्तीसारखा होता. स्वतः मी आयर्लंडचा इतिहास लिहिलेला आहे. व दूरच्या आयरिश

देशभक्तांचें जर आम्हीं कौतुक करितों तर जवळच्या व आपल्याच समाजांत उत्पन्न झालेल्या अशा देशभक्तांचें कौतुक आम्हीं न करणें हा गुन्हा होय असें मी पूर्वी मानीत होतों व आजहिमानतों. कै. गोखले यांना सावरकरांचा बिनसनदशीरपणाचा जुना मार्ग शंभर टक्के नापसंत होता हें सांगावयास नकोच. परंतु सावरकरांच्या इतर गुणांबद्दल गोखले यांनींहि स्वतः मजजवळ अनेक वेळां प्रशंसापर उद्गार काढल्याचें मला पक्कें स्मरतें. असो; आमचा स्वभावभेद कायमचा असला, व त्यामुळें साधनाविषयीं त्यांचा व माझा पूर्वी मतभेद असला तरी आतां तो उरलेला नाहीं. आणि पूर्वीचें त्यांच्या विषयींचें माझें कौतुक मात्र तसेंच शिल्लक आहे. म्हणूनच ही प्रस्तावना लिहिण्याचें मी कबूल केलें.

श्री. सावरकर यांच्या पूर्व चरित्रावर त्यांनींच आपल्या अलीकडील जाणत्या उद्गारांनीं पडदा टाकला असल्यामुळें, या पूर्व चरित्रास आतां पदार्थ-संग्रहालयांतील कांचेच्या कपाटांतील वस्तूचें स्वरूप प्राप्त झालें आहे. प्रत्यक्ष व वर्तमान यांच्याशीं संबंध न येणाऱ्या हकीकतींकडे कोणीहि निर्विकार मनानें पाहूं व बोलूं शकतो. पण ही मनःस्थिति अशी केवळ इतरांचीच असते असें नाहीं तर स्वतः ज्याची त्याचीहि असूं शकते. मोठ्या मनुष्याला त्याच्या लहानपणच्या खोडकर स्थितींतला एखादा फोटो दाखविला तर त्याविषयीं त्याची जी भावना होईल तीच सावरकर यांची त्यांच्या पूर्व चरित्रासंबंधानें आज असेल. समकालीन तरुण पिढीला त्यांचा देशभक्ति भरित खोडकरपणा सर्वस्वी अनुकरणीय नसला तरी स्पृहणीय वाटला खास !

पर्वताच्या माथ्यावर अशा जागा असतात कीं त्यांवर पडलेलें पावसाचें पाणी जर पूर्व समुद्राला जाऊन मिळतें, तर जवळच एका बोटाच्या अंतरावर पडलेलें पाणी पश्चिम समुद्राला जाऊन मिळतें. मनुष्याच्या उन्नत भावनांचाहि, असाच प्रकार असतो. देशभक्तीची उत्कटता तीच असतां स्वभावभेदामुळें कांहीं देशभक्त सद्यःपरिणामी क्रांतिकारक मार्गाला लागतात तर दुसरे सनदशीरपणाचा कंटाळवाणा मार्ग चोखाळीत जन्मभर अंतःकरण पिचवीत असतात. अर्थात्

ही निष्ठा एकच पण मार्गमात्र वेगवेगळे असल्याकारणानें त्यांत अनुभवहि
येतात; व प्रत्येकाला वेगवेगळ्या प्रकारच्या कीर्तिचें फळ मिळतें. पण
त्यांत सावरकरांना मात्र दोन्ही मार्गांचा अनुभव व दोनहि प्रकारची
भण्याचा संभव दिसतो. पहिला म्हणजे क्रांतिकारक मार्ग त्यांचा चोखा-
ळा, व हिंदुस्थानला स्वराज्याची घटना मिळाल्यामुळें यापुढें बंडाला
उरत नाहीं हे उद्गार त्यांनीं काढल्यापासून त्यांच्या दुसऱ्या मार्गाचें
ण सुरू झालें. त्यांच्या एका जवळच्या मित्रानें मला नुकतेंच असें निक्षून
ऐ कीं, प्रतियोगी सहकारितेच्या धोरणावर सावरकरांचा पूर्ण विश्वास
आणि दैवालाहि घटना करणेंच असेल तर तुरुंगवासामुळें त्यांना
ी अपात्रता ( Disqualification ) धुवून निघून, पुढेंमागें प्रांतिक
ांत शिरून, मुंबईइलाख्याला प्रांतिक स्वातंत्र्य मिळाल्यावर, ते प्रधानही
! विलायतेंतलीं उदाहरणें घेतलीं असतां लँडलीगच्या चळवळींत
स भोगलेले आयरिश देशभक्त टिमथी हेली हे नव्या आयरिश
ांत गव्हर्नर झाले. मजूर पक्षाच्या पहिल्या चळवळींत कैद भोगलेले
ा फोडलेले जॉन बर्नस हे इंग्लंडच्या प्रधानमंडळांत प्रधानपद पावले.
एकोणिसाव्या शतकाच्या मध्यभागीं बंडखोरीच्या चळवळींत फांशीची
दिली गेलेले सर चार्लस गॅव्हन डफी हे आस्ट्रेलियांत मुख्य प्रधान झाले.
य भाग्यं' ही म्हण प्रसिद्धच आहे. गॅरिबाल्डीला फांशीची शिक्षा झाली
कालांतरानें सिसिली बेट जिंकून राजास अर्पण करण्याचा मान त्याला
ग; आणि जो गॅरीबाल्डी पूर्वी फांसावर चढावयाचा तो पुढें इटलीचा
कर्ता म्हणून स्वराज्यविषयक मिरवणुकींत एकाच गाडींत राजाच्या डाव्या
बसून मिरवतो हें पाहणाराला काय वाटलें असेल ? विलियम ओब्रायन
यरिश पुढाऱ्यानेंहि अशा स्थित्यंतराला अनुलक्षून आपल्या ' आयरिश
ड्याज ' या पुस्तकांत खालील अनुभव लिहिला आहे.

he ingenuity which had formerly to be employed
ıake off the nightmare in the dark grey coats and

देशभक्तांचें जर आम्हीं कौतुक करितों तर जवळच्या व आपल्याच समाजांत उत्पन्न झालेल्या अशा देशभक्तांचें कौतुक आम्हीं न करणें हा गुन्हा होय असें मी पूर्वी मानीत होतों व आजहिमानतों. कै. गोखले यांना सावरकरांचा बिनसनदशीरपणाचा जुना मार्ग शंभर टक्के नापसंत होता हें सांगावयास नकोच. परंतु सावरकरांच्या इतर गुणांबद्दल गोखले यांनींहि स्वतः मजजवळ अनेक वेळां प्रशंसापर उद्गार काढल्याचें मला पक्कें स्मरतें. असो; आमचा स्वभावभेद कायमचा असला, व त्यामुळें साधनाविषयीं त्यांचा व माझा पूर्वी मतभेद असला तरी आतां तो उरलेला नाहीं. आणि पूर्वीचें त्यांच्या विषयींचें माझें कौतुक मात्र तसेंच शिल्लक आहे. म्हणूनच ही प्रस्तावना लिहिण्याचें मी कबूल केलें.

श्री. सावरकर यांच्या पूर्व चरित्रावर त्यांनींच आपल्या अलीकडील जाणत्या उद्गारांनीं पडदा टाकला असल्यामुळें, या पूर्व चरित्रास आतां पदार्थ-संग्रहाल्यांतील कांचेच्या कपाटांतील वस्तूचें स्वरूप प्राप्त झालें आहे. प्रत्यक्ष व वर्तमान यांच्याशीं संबंध न येणाऱ्या हकीकतींकडे कोणीहि निर्विकार मनानें पाहूं व बोलूं शकतो. पण ही मनःस्थिति अशी केवळ इतरांचीच असते असें नाहीं तर स्वतः ज्याची त्याचीहि असूं शकते. मोठ्या मनुष्याला त्याच्या लहानपणच्या खोडकर स्थितींतला एखादा फोटो दाखविला तर त्याविषयीं त्याची जी भावना होईल तीच सावरकर यांची त्यांच्या पूर्व चरित्रासंबंधानें आज असेल. समकालीन तरुण पिढीला त्यांचा देशभक्ति भरित खोडकरपणा सर्वस्वी अनुकरणीय नसला तरी स्पृहणीय वाटला खास !

पर्वताच्या माथ्यावर अशा जागा असतात कीं त्यांवर पडलेलें पावसाचें पाणी जर पूर्व समुद्राला जाऊन मिळतें, तर जवळच एका बोटाच्या अंतरावर पडलेलें पाणी पश्चिम समुद्राला जाऊन मिळतें. मनुष्याच्या उन्नत भावनांचाहि, असाच प्रकार असतो. देशभक्तीची उत्कटता तीच असतां स्वभावभेदामुळें कांहीं देशभक्त सद्यःपरिणामी क्रांतिकारक मार्गाला लागतात तर दुसरे सनदशीरपणाचा कंटाळवाणा मार्ग चोखाळीत जन्मभर अंतःकरण पिचवीत असतात. अर्थात्

दोघांचीही निष्ठा एकच पण मार्गमात्र वेगवेगळे असल्याकारणानें त्यांत अनुभवहि वेगळे येतात; व प्रत्येकाला वेगवेगळ्या प्रकारच्या कीर्तिचें फळ मिळतें. पण त्यांतल्यात्यांत सावरकरांना मात्र दोन्ही मार्गांचा अनुभव व दोनहि प्रकारचीं फळें लाभण्याचा संभव दिसतो. पहिला म्हणजे क्रांतिकारक मार्ग त्यांचा चोखाळून संपला, व हिंदुस्थानला स्वराज्याची घटना मिळाल्यामुळें यापुढें बंडाला अवसर उरत नाहीं हे उद्गार त्यांनीं काढल्यापासून त्यांच्या दुसऱ्या मार्गांचें आक्रमण सुरू झालें. त्यांच्या एका जवळच्या मित्रानें मला नुकतेंच असें निक्षून सांगितलें कीं, प्रतियोगी सहकारितेच्या धोरणावर सावरकरांचा पूर्ण विश्वास आहे. आणि दैवालाहि घटना करणेंच असेल तर तुरुंगवासामुळें त्यांना जडलेली अपात्रता ( Disqualification ) धुवून निघून, पुढेंमागें प्रांतिक कौन्सिलांत शिरून, मुंबईइलाख्याला प्रांतिक स्वातंत्र्य मिळाल्यावर, ते प्रधानही होतील ! विलायतेंतलीं उदाहरणें घेतलीं असतां लँडलीगच्या चळवळींत तुरुंगवास भोगलेले आयरिश देशभक्त टिमथी हेली हे नव्या आयरिश स्वराज्यांत गव्हर्नर झाले. मजूर पक्षाच्या पहिल्या चळवळींत कैद भोगलेले व खडी फोडलेले जॉन बर्नस हे इंग्लंडच्या प्रधानमंडळांत प्रधानपद पावले. आणि एकोणिसाव्या शतकाच्या मध्यभागीं बंडखोरीच्या चळवळींत फांशीची शिक्षा दिली गेलेले सर चार्लस गॅव्हन डफी हे आस्ट्रेलियांत मुख्य प्रधान झाले. 'पुरुषस्य भाग्यं' ही म्हण प्रसिद्धच आहे. गॅरिबाल्डीला फांशीची शिक्षा झाली असतां कालांतरानें सिसिली बेट जिंकून राजास अर्पण करण्याचा मान त्याला मिळाला; आणि जो गॅरीबाल्डी पूर्वी फांसावर चढावयाचा तो पुढें इटलीचा उद्धारकर्ता म्हणून स्वराज्यविषयक मिरवणुकींत एकाच गाडींत राजाच्या डाव्या हातास बसून मिरवतो हें पाहणाराला काय वाटलें असेल ? विलियम ओब्रायन या आयरिश पुढाऱ्यानेंहि अशा स्थित्यंतराला अनुलक्षून आपल्या 'आयरिश आयडियाज' या पुस्तकांत खालील अनुभव लिहिला आहे.

The ingenuity which had formerly to be employed to shake off the nightmare in the dark grey coats and

rifles has now only to be applied to the more innocent, if more difficult, task of evading "the little addresses" and the "few words" with which popular hospitality will insist upon enlivening the road

उलटे सुलटे खेळ करणें· ही दैवाची लीला सुप्रसिद्धच आहे. दादाभाई नौरोजी यांनीं वयाच्या ऐंशिव्या वर्षी ' मी तरुण असतों तर बंड केलें असतें ' असे उद्गार कलकत्त्यास काढले. विनायकराव सावरकरांनां बंडखोरीचा अनुभव घेऊन प्रतियोगी सहकारितेचें गौरव करण्याचा प्रसंग पसतिशीच्या सुमारासच आला.

तथापि अद्‌भुतरम्यत्वाच्या दृष्टीनें पाहातां सावरकर हे उद्यां प्रधान झाले तरी त्यापेक्षां त्यांनीं विलायतेहून परत येतांना जो पराक्रम केला तोच भावी तरुण पिढीच्या दृष्टीनें अधिक सरस ठरेल यांत शंका नाहीं. प्रधान पुष्कळ होतात; पण जिवावर उदार होऊन पराक्रम करण्याचा प्रसंग थोड्यांना येतो; व आला तरी तो साधणारे त्याहूनहि थोडे असतात. युद्धानंतर लीग ऑफ नेशनसच्या दरबारांत हिंदुस्थानला आम्ही जागा दिली अशी बढाई सरकार मारतें. पण जहाजाच्या पोर्ट होलमधून समुद्रांत उडी टाकून, फ्रान्सच्या भूमीवर पाय ठेऊन, इंटर न्याशनेल लॉची तक्रार सांगून, " बोला हो बोला हो बोला हो सर्व सभ्य बोला हो " असा सवाल जगांतील सर्व राष्ट्रांना करून विनायकराव सावरकरांनींच तें स्थान हिंदुस्थानाला महायुद्धाच्या आधीं पांच वर्षें मिळवून दिलें होतें !

असो. सावरकर सुटून आले आहेत व त्यांना थोडीशी स्वतंत्रताहि लाभली आहे. परंतु त्यांच्या अज्ञातवासाचीं अजून चार साडेचार वर्षें जावयाचीं आहेत. तेव्हां हेहि दिवस लौकर निघून जावोत व तुरुंगवासांत घालविलीं तितकीं वर्षें तरी त्यांना या नव्या मार्गानें देशाची सेवा करण्याला मिळोत अशी इच्छा प्रदर्शित करून ही प्रस्तावना पुरी करितों.

मुंबई ता. ६ आगष्ट १९२४. } नरसिंह चिंतामण केळकर.

---

# स्वतःचे दोन शब्द

ते काय असणार ? पण ह्या दोन शब्दांतच चरित्र लेखनारंभाचें कथानक वाचकांना मला सांगावयाचें आहे.

रत्नागिरीच्या जेलमध्यें बॅ० सावरकर हे कैदी म्हणून असतांना सुमारें दीड वर्षापूर्वी तेथल्या राष्ट्रीय शाळेंत मी एक विद्यार्थी होतों. एकदां बॅ० सावरकर हे फार सीक झाल्याचें वृत्त समजलें. त्यावेळीं त्यांचे बंधु डॉ. नारायणराव हे त्यांना भेटण्याकरितां आले होते. मी त्यांच्या बरोबर जाण्याचा यत्न केला ! पण यत्न केला इतकेंच; कारण त्यांत मला यश येणेंच शक्य नव्हतें. मनांत एवढीच इच्छा कीं, बोटींतून उडी टाकून फ्रान्सचा किनारा गांठणाऱ्या-अगदीं लहान वयांतच अचाट साहस करून सर्व जगाचे डोळे आपणाकडे लावून घेणाऱ्या या नरवीराचें एकवार तरी दर्शन घडावें.

प्रयत्नानें सर्व कांहीं साध्य होतें म्हणतात. रत्नागिरीच्या तुरुंगांतून मला एकदां कापड घेण्याची बुद्धि झाली ! व एक दिवस मी सुमारें चार वाजतां त्या जेलच्या दरवाजावर गेलों. त्यावेळीं तुरुंग, कैदी--काम वगैरे सर्वच नवीन असल्यामुळें दरवाजाच्या आंतून दिसणाऱ्या प्रत्येक गोष्टीवर मी नजर टाकीत होतों. इतक्यांत एक कैदी आंतच असलेल्या ऑफिसवर आला. पांच चार मिनिटें झाल्यावर जेव्हां तो परत जाऊं लागला तेव्हां जरा थांबला. इतक्यांत शिपाई आपसांत म्हणूं लागले कीं, "सावरकरची प्रकृति आतां ठीक दिसते." मी आंत पाहिलें—त्यावेळीं ते एकवार दरवाजाकडे पाहून परत जाऊं लागले-- मी त्यांच्या पाठमोऱ्या चालत्या शरीराला नमस्कार केला--हेंच त्यांचें दर्शन.

तेथें असतांनाच त्यांचीं पदें ऐकण्याचा नादच लागला होता. तीं म्हण- ण्याचा आवाजाच्या दृष्टीनें नसला तरी प्रेमळपणाचा उमाळा माझा एक भाऊ आणि कसब्यांतील एक बालवयी मित्र यांना वारंवार येत असे. तीं पदें वैशाख

महिन्यांतल्या वद्य पक्षांतल्या एका रात्रीं वर उल्लेखिलेल्या गांवीं झटलीं गेलीं व विचार करतां करतां असें ठरविलें कीं, मिळेल तेवढीच माहिती मिळवून हें चरित्र आपण महाराष्ट्र जनतेसमोर ठेवावयाचें. पण हें ठरविण्याचें काम फारच सोपें होतें. प्रत्यक्ष माहिती मिळविण्याचा आरंभ केला तेव्हां आपल्या हातून बहुधा हें कार्य तडीस जाणार नाहीं असें वाटूं लागलें. पण सावरकर ज्यावेळीं 'माखजन' येथें आले होते त्यावेळीं त्यांचे स्नेही नागपूरचे प्रसिद्ध पुढारी श्री. विश्वनाथराव केळकर हेही आले होते. त्यांचेजवळ शब्द टाकून पाहिला. त्यांनीं आनंदानें माहिती देण्याचें कबूल केलें. येथूनच कार्याला आरंभ झाला व पुढें श्री. गणेशपंत, डॉ. नारायणराव, श्री. भाऊसाहेब चिपळूणकर इत्यादि प्रेमी गृहस्थांचे मदतीनें हें लहानसें कार्य तडीला गेलें. सर्व कार्य हें जर त्यांच्या प्रेमाचेंच दृश्य तर मग मी आभार कोणच्या शब्दांत मानायचे? बॅ. विनायकराव ह्यांना मी पुष्कळ वेळां कांहीं महत्त्वाच्या गोष्टी सांगण्याची विनंती केली. पण त्यांनीं ती आभारपूर्वक नाकारली. बोटींतल्या उड्डाणाची हकीगत मात्र मोठ्या जिकिरीनें सांगितली. या ठिकाणीं एक गोष्ट सांगणें जरूर आहे कीं, मिळालेली सर्व माहिती जरी खरी असली तरी त्यांतलें एकादें वाक्य अगर शब्द अगदीं तंतोतंत खराच असेल असें मात्र सांगतां येत नाहीं.

दे. भ. तात्यासाहेब केळकर ह्यांना प्रस्तावना लिहून देण्याची विनंति केली व ती त्यांनीं स्वीकारली ह्याबद्दल; तसेंच श्री. श्रीधर गोविंद उर्फ अण्णासाहेब भावे यांच्या अनेक प्रकारच्या मदतींबद्दल आणि माझ्या वडलांचे परम स्नेही श्रीयुत केशवराव म्हसकर यांनीं केलेल्या निरनिराळ्या सूचनांबद्दल मी सर्वांचा फार आभारी आहें.

माखजन १५-८-२४ सदाशिव राजाराम रानडे.

# स्वातंत्र्यवीर विनायकराव सावरकर.



चौदा वर्षे खडतर बंदिवास भोगल्यानंतर आपण आमच्यांत येऊन अद्यापही बंदिवासांत आहांत. हा आपला बंदिवास लवकरच नष्ट होवो व आपणास राष्ट्रकार्य करण्याकरतां परमेश्वर दीर्घायुषी करो.

सदाशिव राजाराम रानडे.

# स्वातंत्र्यवीर विनायकराव सावरकर

यांचें

# संक्षिप्त चरित्र.

## प्रकरण १ लें.

### जन्म आणि बाळपण.

नाशिक जिल्ह्यांतील कँटोन्मेंट विरुद्धच्या चळवळींत प्रसिद्धीस आलेल्या " भगूर " नांवाच्या लहानशा गांवीं बॅ. विनायकराव सावरकर यांचा इ. स. १८८३ च्या मे महिन्यांत जन्म झाला. विनायकरावांचे वडील दामोदरपंत हे एक सच्छील विद्वान्-धार्मिक असे सद्गृहस्थ होते. तसेंच ते एक प्रतिभासंपन्न कवि होते. त्यांचें घराणें मूळपासूनच खानदानी होतें. आल्यागेल्यांची त्यांचेकडे फार गर्दी असे. दामोदरपंतांच्या एका पूर्वजानें पेशवाईत पराक्रम करून एक लहानशी जहागीर कमावली होती ती अगदीं परवां परवांपर्यंत म्हणजे सन १९०९ सालीं सरकार जप्त करीपर्यंत ह्या घराण्यांत चालत होती. दामोदरपंतांना एकंदर चार अपत्यें होतीं. वडील मुलाचें नांव गणेशपंत उर्फ बाबासाहेब सावरकर, ( हे श्री. विनायकराव सुटण्यापूर्वी ९ महिने अगोदर जन्मठेपेंतून सुटले आहेत ) दुसरे आपले चरित्रनायक बॅ. विनायकराव, तिसऱ्या श्रीमती मैनाबाई अथवा माई ( ह्यांना त्र्यंबकजवळ रा. काळे यांजकडे दिलेल्या आहेत ) व चौथे डॉ.

नारायणराव सावरकर होत. बाबा हे विनायकरावांपेक्षां चार वर्षांनीं वडील असून डॉ. सावरकर हे पांच वर्षांनीं धाकटे आहेत.

* * * * *

लहानपणीं ह्या बालकास कविता करण्याचा छंद लागला. इतक्या लहानपणीं कीं त्यावेळीं त्याची मुंजही झाली नव्हती. आईपाशीं रामविजय-हरिविजय इत्यादि ग्रंथ वाचले जात ते ऐकून व वडिलांनीं संशयरत्नमाला त्यास तोंडपाठ शिकविली होती ती वारंवार म्हणून विनायकाला एक काव्य करण्याची स्फूर्ति झाली, व त्यानें लगेच एक महाकाव्य करण्याची प्रतिज्ञाही केली. हें महाकाव्य कोणतें ? कसें ? हें त्याचें त्यालाही माहीत नव्हतें. पण वारंवार त्यानें कविता करून दाखवाव्या आणि म्हणावें कीं आपण महाकाव्य करणार ! या विचारानें या आठ वर्षांच्या बालकानें काव्यदेवतेची पूजा आरंभिली. तो ओंव्या मुंजीच्या आधीं इतक्या झपाट्यानें रची कीं झोंपाळ्यावर एका बाजूला शेजारच्या मुली येऊन बसत व शिकविलेल्या ओंव्या म्हणत व दुसऱ्या बाजूला विनायक बसे व नव्या ओंव्या रचून त्या मुलींना तो हटवून टाकीत असे. पुणें येथें त्यावेळीं प्रसिद्ध होणाऱ्या " जगद्धितेच्छु " पत्रांत तर विनायकाच्या दहाव्या वर्षींच त्याच्या कविता प्रसिद्ध होऊं लागल्या. शेवटीं दिलेला स्वदेशीचा फटका व सवाईमाधवरावाचा रंग हीं त्यानें वयाच्या दहाव्या वर्षींच रचिलीं होतीं.

जगद्धितेच्छुकाराला माहीतही नव्हतें कीं, आपण ज्या कवीच्या कविता प्रसिद्ध करीत आहों तो दहा वर्षांचा बालक असेल. तसें कळतें तर कदाचित त्या प्रसिद्धही झाल्या नसत्या.

श्री. दामोदरपंतांच्या घरांत एक पेशव्यांची जीर्ण बखर असे. एक निबंधमालेचा भाग असे. कांहीं महाभारताचें भाषांतर व स्वधर्मप्रदीप ह्या मासिकाचे जुने अंक असत. विनायकाच्या एकसारख्या वाचनानें हीं सर्व पुस्तकें जवळ जवळ त्याचीं पाठ झालीं होतीं. विनायक पेशव्यांच्या बखरींवर तर

बोलतां बोलतां ओंव्या रची व आपल्या संवगड्यांना त्यानें शिवकालीन इतिहास कांहीं ओंव्या म्हणून तर कांहीं गोष्टी सांगून शिकविला होता. शिवचरित्र तर विनायक आपल्या मित्रमंळीला उत्साहपूर्ण अभिमानानें सांगे.

* * * * *

मुंज झाल्यावर थोडेच दिवसांत ह्या मुलांच्या मातुश्री वारल्या आणि हें चिल्यापिल्यांचें कुटुंब उघडें पडलें. ह्यावेळीं श्री. दामोदरपंत हे ४० वर्षांचे असावेत. त्यांनीं दुसरें लग्न न करतां स्वतः हातानें वर्षानुवर्षें स्वयं-पाक करून ह्या आपल्या चारी चिल्यापिल्यांचें संगोपन मातेपेक्षांही अधिक प्रेमानें व आतुरतेनें केलें. हे दिवस १८९३ चे होते. याच वर्षी मुंबईस हिंदुमुसलमानांचे दंगे झाले. ती बातमी वृत्तपत्रांतून वाचून विनायकरावांनीं आपले बालसंवगडी एकत्र करून हिंदु समाजाचे व धर्माचे रक्षणार्थ काय केलें पाहिजे याची चर्चा केली. व अंतीं हें निश्चित ठरविलें कीं, मुसल-मानांनीं केलेल्या ह्या अपमानाचा सूड भगूरच्या वेशीबाहेर असलेल्या एकुलत्या एक लहान मशिदीवर हल्ला चढवून काढायचा. झालें! ती दहा बारा वर्षांची मुलांची टोळी—बालवीर—संध्याकाळीं गनिमी पद्धतीनें लपत छपत हल्ला चढविण्याकारितां गेली. मशीदींत कोणीही नव्हतेंच—कचित् शत्रु ह्या दहा बारा वीरांच्या प्रचंड सैन्याला भिऊन पळूनही गेले असतील!!

* * * * *

बालवीरांच्या ह्या टोळीनें मनसोक्त मोडतोड करून व शिवछत्रपतींच्या हल्ल्यांचीं धुळाक्षरें वळवून तेथून पाय काढला. पुढें ही बातमी मुसलमान मुलांस कळून भगूर गांवांतलिच एका मराठी शाळेच्या रणक्षेत्रांत—पडवींत—शिक्षक येण्याचे पूर्वी फारच मोठी लढाई झाली. पण मुसलमान मुलांच्या दुर्दैवानें त्यांच्यांत चाकू टांचण्या कोणापाशींही नव्हत्या. विनाय-काचे नेतृत्वाखालीं असलेल्या हिंदु मुलांजवळ हें सर्व साहित्य सज्ज असे. शस्त्रास्त्राशिवाय लढाई कसली? अर्थात्च हिंदूंचा जय झाला! मुसल-

मान मुलें चिडीस गेलीं व त्यांतील एक दोन घटिंगण मुलांनीं विनायकास बाटविण्याची प्रतिज्ञा केली. अपयशाचा हा राग काढण्यासाठीं त्यांनीं विनायकाचे तोंडीं मोदकां ऐवजीं " बोंबिल * " मासा कोंबण्याचें ठरविलें. त्यांत त्यांना अपयश आलें हें निराळें लिहिणें नकोच. परन्तु इकडे जी एकदां लढाईची आग भडकली ती कांहीं केल्या शांत होईना ! मशिदीवर हल्ला चढवितांना कांहीं मुलें रेंगाळल्यासारखीं—चुकार तट्टू—दिसलीं. कांहींनीं रेंगाळल्यासारखें करीत असतांच लघ्वीचें निमित्त केलें व पोबारा केला ! कांहीं बाहेर राहून पहारा देणार असा स्वकर्तव्याचा निर्धार प्रकट करूं लागलीं. जेव्हां विनायकरावांचे लक्षांत आपल्या मित्र-मंडळींत असलेले हे दुर्गुण आले त्यावेळीं त्यांनीं सर्वांना हे दोष सुधारून अंगीं धैर्य आणण्याचा उपदेश केला. सर्वांना तो रुचला व त्यांनीं उपदेश करण्याविषयीं विनंती केली. विनायकरावांनीं त्यांना शिक्षण देण्याकरितां एक ' सैनिक शाळा ' काढली ! ह्या शाळेंत निंबोळ्या करण्याचें शिक्षण देण्यांत येत असे. आपल्या गोटांतील मुलें विभागून त्यांना ह्या निंबोळ्या वांटून द्यायच्या व एक हद्द ठरवून त्या निंबोळ्यांसह युद्धाला उभयपक्षीं आरंभ करायचा. एकपक्ष हिंदु होई व दुसरा मुसलमान वा इंग्रज होई. मधल्या हद्दीवर एक निशाण लावलेलें असे. तें पाडाव करून प्रतिपक्षाचे हद्दींत शिरणाऱ्या पक्षाचा जय झाला असें मानण्यांत येई. निंबोळ्या फेंकीत ते दोन्हीपक्ष आपसांतील युद्धाला आरंभ करीत. बहुधा यश विनायक पक्षाला असे. क्वचित् एकादे प्रसंगीं अपयश आलेंच तर विनायक आयत्यावेळीं देशभक्तीचें स्तोत्र गायी ! व त्या तात्पुरत्या परधर्मी झालेल्या विदेशी बनलेल्या पक्षाचे मनांत हें स्तोत्र इतकें बाणे कीं आपला पक्ष कोणचा हें भान न राहून ते

* टीपः—पण हें भाग्य विनायकराव विलायतेस जात असतांना एका ख्रिश्चन सैंपाक्याचे पदरीं पडलें. त्यानें एकदां रागानें विनायकरावांना एकटेंच गांठून मासे कोंबले. पुढें मग ते बोटीवर युरोपीयन आहार घेत असत.

अपयशाचें खापर माथीं घेऊन हिंदु पक्षाला मिळत. कोणत्याही कारणानें कां असेना हिंदुचा जय झाला कीं तें सर्व सैन्य पोवाडे गातगात भगूरच्या ल्हानशा गल्ल्यांतून मिरवत येई. (प्रस्तुत लेखक नाशिकला बॅ० सावरकर ह्यांजबरोबर गेला असतां भेटायला आलेल्या एका वृद्ध सद्गृहस्थानें ह्या सर्व गोष्टी आम्हाला स्वाभिमानपूर्वक सांगत असतांना त्यांना आनंदाश्रु आले.)

* * * * *

हे दिवस १८९७ चे होते. पुणेंवैभव—केसरी—गुराखी—जगद्धितेच्छु ह्या पत्रांच्या प्रत्येक अंकाचें पारायण विनायक मोठ्या आतुरतेनें करी. इतर संवगड्यांचें ह्या गोष्टींकडे लक्षही नसे. परंतु विनायक त्या सर्वांना सर्व राजकीय परिस्थिति समजावून देत असे. ग्रामण्य प्रकरण—प्लेगची धामधुम—शिवाजीउत्सव—गणपत्युत्सव—लो० टिळकांची कौन्सिलांतील निवडणूक इत्यादि चळवळींचा प्रतिध्वनि ह्या मुलांच्या हृदयाकाशांत पुण्यांतील आकाशांत होत नसेल इतक्या आतुरतेनें होऊन त्याला रात्रीं अकरावाजेपर्यंत सुद्धां झोंप लागत नसे. रात्रीं त्याचे संवगडी अभ्यासाला येत. त्यांना ह्या सर्व गोष्टी समजाऊन सांगून आपण काय केलें असतां हिंदुस्थान स्वतंत्र होईल ? ह्याची वाटाघाट करीत बसे. ह्या संवगड्यांत मुख्य म्हटलें म्हणजे गोपाळ भिकू—राणबा शिंप्यांचीं मुलें होत.

* * * * *

भगूर गांवांत गेल्या तीन वर्षें चाललेल्या कँटोन्मेंटच्या झगड्यांत प्रसिद्धीला आलेले दे. भ. गोपाळराव देसाई हाच पूर्वीचा "गोपाळ" होय. व संप करून तुरुंगांत जाणारी मंडळी हेच विनायकरावाचे संवगडी होत. विनायकाला आतां १४ वें वर्ष लागलेलें होतें. तेव्हां त्यांचें बालपण येथेंच संपलें असें मानण्यास हरकत नाहीं.

---

## 'देशी फटका'

आर्य बंधुनो उठा उठा कां मठासारखे नटा सदा ।
हटा सोडुनी कटा करूं या म्लेंच्छ पटां ना धरूं कदा ॥ १ ॥ धृ.
काश्मीराच्या शाला सोडुनि अल्पाकाला कां भुलतां ? ॥
मलमल त्यजुनि वलवल चित्तीं हलहलके पट कां वरितां ? ॥२॥
राजमहेंद्री चिटा त्यजुनि कां विटके चिट हें कां घेतां ? ॥
दैवें मिळतां वाटि, इच्छितो नरोटि नाहीं कां हाता ! ॥ ३ ॥
येवलि सोडुनि पितांबरांना विजार करण्यासाठिं महा ॥
बेजारचि तुम्हि नटावयामधि विचार करितो कोणि न हा ॥४॥
केलि अनास्था तुम्हिचि स्वतः मग अर्थातचि ती कला बुडे ॥
गेले दिन हे नेले हिरुनी मेले तुम्हि तरि कोण रडे ? ॥ ५ ॥
अरे आपणच होतों पूर्वीं सर्व कलांची खाण अहा ॥
भरतभूमिच्या कुशीं दीप ते कलंक आतां अम्ही पहा ॥ ६ ॥
जगभर भरुनी उरला होता नुरला आतां व्यापार ॥
सकलही कलाभिज्ञ तेधवां अज्ञ अतां अरिही थोर ॥ ७ ॥
निर्मियली मयसभा अम्हिचि ना ? पांडव किरिटी आठवारे ॥
मट्ठ लोकहो ! लाज कांहिंतरि ? लठ्ठ असुनि शठ बनलोरे ॥ ८ ॥
आम्रफलाच्या कोयीमध्यें धोतरजोडा वसे सदा ॥
होते जेथें प्रतिब्रम्हेची धिक मी जन्मुनि अपवादा ॥ ९ ॥
हे परके हरकामीं खुलविति भुलविति वरवर वाचेनें ॥
व्यवहार रीती ऐशि बरोबर सदा हरामी वृत्तीनें ॥ १० ॥
कामधेनुका भरतभूमिका असूनि मग कां ही भिक्षा ॥
सहस्र कोसांवरुनि खासा पैका हरतो प्रभुदीक्षा ॥ ११ ॥

नेती कच्चा माल आमुचा देती साचा पक्क रुपें ॥
आमुच्या वरतीं पोट भरिति परि थोरि कशाची तरी खपे ॥१२॥
पहा तयांची हीच रीत हो ! मिती नसे त्या लबाडिला ॥
नाना कर्में नाना वर्में देश आमुचा लुबाडिला ॥ १३ ॥
निमुली हातामधलीं फडकीं फडकत नाना ध्वज वरतीं ॥
हडलहप्पसे करुनि शिपाई निघत स्वारी जगभर ती ॥ १४ ॥
नाना परिचे रंग भरीती रंग पुष्प ते दंग करी ॥
मोर, कावळे, ससे पारवे श्वापद विचरती तीं बकरीं ॥ १५ ॥
राजगृहीं गोपुरें झळकती मजले सजले त्यामधुनी ॥
सुंदर नारी दुःख हर्ष भरि त्या बघति शोभा तरुणी ॥ १६ ॥
नाना जाती पिकली शेती गार हीरवें वस्त्र धरी ॥
भात बाजरी गहूं गाजरी आच्छादिली हि भूमि बरी ॥ १७ ॥
अगनग गेले गगन चुंबिण्या सर्व थोरबहु कोराकी ॥
भास पुरुषची निजांकिं बसवी स्वानंदानें पोरां की ॥ १८ ॥
चित्रे ऐशीं दाविति छत्रें विचित्र तुम्हा भुल धंदा ॥
तुम्हीहि भुलतां पहातां घेतां क्षणांत स्वपटाला निंदा ॥ १९ ॥
याला आतां उपाय बरवा एकी करवा मन भरवा ॥
ओतप्रोत अभिमानें हरवा देशी धंदे पट करवा ॥ २० ॥
परके वरवर कितीहि बोलती गोड गोड तरि मनिं समजा ॥
सुंदर म्यानीं असे असिलता घातचि होइल झट उमजा ॥ २१ ॥
रावबाजि तरि गाजि जाहले राज्य बुडालें तरि मुख्य ॥
सख्य असे परि परकीयांचें गोष्ट हृदयिं ही धरु लख्ख ॥ २२ ॥
वैर टाकुं या यास्तव लौकर खैर करो परमेश्वर ती ॥
निश्चय झाला मार्गे अपुला परदेशी पट ना धरती ॥ २३ ॥

चला चला जाउं या घेउं या देशि पटांना पटापटा ।।
जाडे भरडे गडे कसेही असो सेवुं परि झटाझटा ।। २४ ।।

ना स्पर्शू त्या पशूपटाला मउ वरि विखार तर भावूं ।।
घेऊं खडतर अंतीं सुखकर धर्मचि मानुनियां राहूं ।। २५ ।।

द्रव्य खाणि ही खोरें घेउनि परकीपोरें खणितीरे ।।
एकचित्त करुनियां गड्यानों ! वित्त जिंकुंया पुनरपिरे ।। २६ ।।

विश्वेश्वरि ती नारायणि ही यमहरि हर अदि सुरवरिणीं ।।
कर्म सिद्धिसी दावो नेउनि मोद देति निज भक्त जनीं ।। २७ ।।

दूर अज्ञानी रजनी जावो सांग प्रकाशो रविज्ञान ।।
वरावयाला रत्न पटांनां करो आर्य ते रणदान ।। २८ ।।

कवितारूपी माला अर्पी आर्य बंधुशीं सार्थक हो ।।
भक्तांकरवी मन देवांसी सेवा त्यांशीं अर्पण हो ।। २९ ।।



# प्रकरण २ रें.

## स्वातंत्र्यप्रिय विचार.

१८९७ च्या चळवळींचा कळस झाला पुण्यास टिळक पकडले गेले व ंदींत पडले. पुण्यांत रँड साहेबाला मारणाऱ्या चाफेकर बंधूंपैकीं दामोदरपंत ाफेकर व बाळकृष्ण हे सांपडले. त्या दोघां बंधूंना पकडून देणाऱ्या ःविडबंधूंना वासुदेवराव रानडे ह्यांनीं देहांत प्रायश्चित्त दिलें. प्रतिदिनीं ःक एक अद्भुत वार्ता कर्णीं पडावी ! प्रत्यही अंगांत वीर्याच्या विजा चम-ाव्या ! रँड आयर्स्ट गेले !—प्लेगचा छळही गेला !—द्रविडही गेले !—ते ाफेकरही गेले !—आणि तें १८९७ चें भेसूर वर्षही गेलें ! !

* * * * *

परन्तु त्या वर्षाची ती भयंकर दीप्ति ह्या किशोराचे मनांत जशीच्या ाशीच कायम राहिली. या वयांत विनायकाचे वयांतील इतर मुलांना व ा मोठ्यांना संसाराचीं मोहक व रंगी बेरंगी असणारीं बेगडी सुखस्वप्नें पडत ातीं. पण ह्याच सर्व गोष्टी विनायकाला काळ्याकुट्ट भासत होत्या. प्रतिष्ठित ज्जनांना ज्या गोष्टी काळ्याकुट्ट व उत्सारक भासतात त्याच विनायकाला ापल्या दिव्य पण दाहक आकर्षणशक्तीनें आपल्याकडे ओढूं लागल्या ाफेकरांची स्मृति त्यांचे मनांत वारंवार चमकूं लागली. त्यांच्या कष्टांचीं ाणारीं वर्णनें वाचतांना तो जेव्हां तेव्हां आपल्या अश्रूंनीं तीं भिजवूं लागला. ासुदेवराव रानड्यांना जेव्हां फांशीची शिक्षा झाली तेव्हां त्यांनीं सांगि-लेंकीं पाहिजे तर पुढील जन्माची फांशीही याज जन्मीं द्या.” तेही फांशी ले व त्या बातमीचा अंक विनायकाचे हातीं पडला.

* * * * *

चला चला जाउं या घेउं या देशि पटांना पटापटा ॥
जाडे भरडे गडे कसेही असो सेवुं परि झटाझटा ॥ २४ ॥

ना स्पर्शू त्या पशूपटाला मउ वरि विखार तर भावूं ॥
घेऊं खडतर अंतीं सुखकर धर्माचि मानुनियां राहूं ॥ २५ ॥

द्रव्य खाणि ही खोरें घेउनि परकीपोरें खणितीरे ॥
एकचित्त करुनियां गड्यानों ! वित्त जिंकुंया पुनरपिरे ॥ २६ ॥

विश्वेश्वरि ती नारायणि ही यमहरि हर अदि सुरवरिणीं ॥
कर्म सिद्धिसी दावो नेउनि मोद देति निज भक्त जनीं ॥ २७ ॥

दूर अज्ञानी रजनी जावो सांग प्रकाशो रविज्ञान ॥
वरावयाला रत्न पटांनां करो आर्य ते रणदान ॥ २८ ॥

कवितारूपी माला अर्पी आर्य बंधुशीं सार्थक हो ॥
भक्तांकरवी मन देवांसी सेवा त्यांशीं अर्पण हो ॥ २९ ॥



# प्रकरण २ रें.

## स्वातंत्र्यप्रिय विचार.

१८९७ च्या चळवळींचा कळस झाला पुण्यास टिळक पकडले गेले व बंदींत पडले. पुण्यांत रँड साहेबाला मारणाऱ्या चाफेकर बंधूंपैकीं दामोदरपंत चाफेकर व बाळकृष्ण हे सांपडले. त्या दोघां बंधूंना पकडून देणाऱ्या द्रविडबंधूंना वासुदेवराव रानडे ह्यांनीं देहांत प्रायश्चित्त दिलें. प्रतिदिनीं एक एक अद्भुत वार्ता कर्णीं पडावी ! प्रत्यही अंगांत वीर्याच्या विजा चमकाव्या ! रँड आयर्स्ट गेले !—प्लेगचा छळही गेला !—द्रविडही गेले !—ते चाफेकरही गेले !—आणि तें १८९७ चें भेसूर वर्षही गेलें ! !

* * * * *

परन्तु त्या वर्षाची ती भयंकर दीप्ति ह्या किशोराचे मनांत जशीच्या तशीच कायम राहिली. या वयांत विनायकाचे वयांतील इतर मुलांना व व मोठ्यांना संसाराचीं मोहक व रंगी बेरंगी असणारीं बेगडी सुखस्वप्नें पडत होतीं. पण ह्याच सर्व गोष्टी विनायकाला काळ्याकुट्ट भासत होत्या. प्रतिष्ठित सज्जनांना ज्या गोष्टी काळ्याकुट्ट व उत्सारक भासतात त्याच विनायकाला आपल्या दिव्य पण दाहक आकर्षणशक्तीनें आपल्याकडे ओढूं लागल्या चाफेकरांची स्मृति त्यांचे मनांत वारंवार चमकूं लागली. त्यांच्या कटांचीं येणारीं वर्णनें वाचतांना तो जेव्हां तेव्हां आपल्या अश्रूंनीं तीं भिजवूं लागला. वासुदेवराव रानड्यांना जेव्हां फांशीची शिक्षा झाली तेव्हां त्यांनीं सांगितलेंकीं पाहिजे तर पुढील जन्माची फांशीही याज जन्मीं द्या. ” तेही फांशी गेले व त्या बातमीचा अंक विनायकाचे हातीं पडला.

* * * * *

राजकीय खळबळीचीं तरुण हृदयास हालवून सोडणारीं अशीं हीं स्थित्यंतरें चाललीं असतांना विनायकाचे हृदयांत देशभक्तीच्या उर्मी उसळूं लागल्या. आपल्या ह्या परतंत्र देशाला पुनरपि वैभवसंपन्न आणि स्वराज्यमंडित करण्यासाठीं तरुण देशभक्त निर्माण झाले पाहिजेत. चाफेकर–रानडे जे तारुण्याच्या ऐन भरांत गेले–संसारसुख–संपत्ति ह्यांच्यावर ज्यांनीं लाथ मारली–ती एवढ्याच करतां कीं, आपला देश स्वतंत्र करण्याकरितां अनेक राष्ट्रभक्त परत निर्माण झाले पाहिजेत–राष्ट्रोद्धाराकरतां स्वार्थाचा असा होम त्यांनीं केला पाहिजे ही गोष्ट सत्य आहे म्हणून. मग ही जर गोष्ट सत्य आहे–राष्ट्रोद्धार जर स्वार्थाच्या होळीशिवाय होत नाहीं तर आपण तरी स्वार्थाचा होम करून राष्ट्रमाता स्वतंत्र करण्यास कां तयार होऊं नये ? हा एकच विचार विनायकाचे हृदयाला रात्रंदिवस पोळीत होता.

* * * * *

त्या बालकाची लहानपणींच त्याच्या कुलानें कुलस्वामिनी मानलेल्या देवीच्या भव्य पण सुंदर मूर्तीवर फारच भक्ति होती. तो तिच्या पूजेंत केव्हां केव्हां इतका गढलेला असे कीं; ध्यानाचे मंत्र म्हणत असतांना तो शुद्धि सोडून केव्हां केव्हां बेभान होई ! त्या देवीला मनोभावानें प्रार्थना केली असतांना त्या सफल होतात असा त्याचा विश्वास होता. तिच्यासाठीं फुलें जमविण्यांत पूजा बांधण्यांत–सप्तशतीच्या पाठांतील युद्धप्रसंगाचे अध्याय वाचण्यांत तो दिवसचे दिवस व रात्रीच्या रात्री घालवी. देवीची ती सुंदर पण भव्य मूर्ती भगूर गांवांत अद्यापि अस्तित्वांत आहे.

* * * * *

त्या देवीची पूजा अशाच एका दिवशीं भक्तिभावानें पुरी करून या देशांतल्या दुःस्थितीनें तळमळणाऱ्या किशोरानें, सद्गद अंतःकरणानें देवीचें ध्यान आरंभिलें. व शेवटीं तिच्या पवित्र चरणांवर हात ठेऊन–तिला साक्षी

ठेऊन—त्या समग्रपूजाभूषित, सिंहावर आरुढ झालेल्या अष्टभुजा व अष्टभुजांमध्येंही आयुधें, विकसित कमलपुष्प, शंख वगैरे उपकरणें धारण केलेल्या जगन्मातेपुढें कळवळून जाऊन आपलें सर्व जीवन, सर्व सामर्थ्य, सर्व संपत्ति—देशमातेच्या उद्धाराकरतां—तिला पुनरपि स्वराज्यमंडित आणि वैभवसंपन्न करण्याकरतां अर्पण करीन असा वज्रघोर निश्चय केला! त्या लहानशा देवाल्यांत अनेक सुगंधिक कुसुमांचा दरवळ पसरलेला होता. तुपाचा दिवा मंदमंद रीतीनें निरांजनामध्यें तेवत होता. उदबत्त्यांचा उन्मादकारक वास कुसुमांच्या कोमल परिमलामध्यें मिसळून गेला होता. जगन्मातेची मूर्ती जणूं सुहस्य वदनानें-मंदस्मित करीत असलेली त्या अंधुक प्रकाशांत दिसत होती! अशा पुण्यमय वातावरणांत जगन्मातेसमोर देशमातेच्या उद्धाराची त्या लहानग्या किशोरानें शपथ वाहिली. त्या वेळीं किशोराचें वय १५।१६ वर्षांचें असावें. हें वर्ष इ. स. १८९९ चें होतें.

* * * * *

हाच पुढें अखिल हिंदुस्थानांत गाजलेल्या **अभिनव भारत** संस्थेचा जन्मदिवस होय. किशोराच्या या निश्चयांतच त्या संस्थेचा उगम झाला.

* * * * *

त्या दिवसापासूनचा काळ अनन्य भावानें त्यानें आपल्या कल्पनांचा प्रसार करण्यांत घालविला. भगूरसारख्या लहान गांवीं शिवाजीउत्सव—गणपत्युत्सव आरंभिले. आपल्या देशांतील देशवीरांच्या कृत्यांनीं समाजांत चेतना उत्पन्न व्हावी म्हणून त्यानें अनेक पद्यें—पोवाडे रचले. त्यांतील एक पोवाडा .........अद्यापही कोठें कोठें ऐकूं येतो. स्वतांच कर्त्याकडून म्हटला जात असतां ज्यांनीं ज्यांनीं तो ऐकिला आहे त्यांना त्यांना आठवण आहेच कीं अर्धा अर्धा तासपर्यंत ती कविता चालली असतांना मनोवृत्ति कशा उचंबळून येत! श्रोत्यांच्या नेत्रांतून त्या हौतात्म्यांचें वर्णन ऐकतांच अश्रूंच्या कशा धारा वहात!

* * * * *

पण आपल्या मुलाला हें निराळेंच वळण लागलेलें पाहून दामोदरपंतांना एक निराळीच चिंता वाटूं लागली. वास्तविक त्या मुलाला कवितेची, इतिहासाची, देशप्रेमाची रुचि बालपणापासूनच त्याच्या वडिलांनीं लाविली होती. ते नेहमीं त्याच्या गुणांचा परिपोष करून त्याच्या स्मृतिशक्तीचा व कर्तृत्वाचा मनांतले मनांत फार अभिमान बाळगीत. पण जेव्हां त्यांनीं त्याला रात्रंदिवस येतां जातां अल्पवयांतच हौतात्म्यांच्या गोष्टी बोलतांना ऐकिलें, रात्रीच्या रात्रीं जागतांना पाहिलें व त्याच्या मुद्रेवर एक अकालिक गंभीरता व चिंता उत्पन्न झालेली पाहिली तेव्हां ते जरा दचकले. एका दिवशीं त्यांनीं त्याला रात्रीं १२ वाजतां कविता लिहितांना पाहिलें. विनायक त्यामध्यें अगदीं गढून गेलेला होता. त्याच्या सुंदर मुखावर—पाणीदार नेत्रांतून मुखावर वारंवार येणारा अश्रुप्रवाह पुशीत पुशीत त्यानें कविता गुणगुणत—पुढला चरण लिहावा असें सारखें चाललें होतें. वडील सन्निध उभे तरी पत्ता नाहीं! अशा स्थितींत वडिलांनीं कौतुकानें त्याच्या हातांतील कागद घेतला व पाहिलें तों एका देशवीराची कविता!! वडिलांस—कां कुणाला माहित चर्र झाल्यासारखें झालें, व त्यांनीं विनायकाला कुरवाळीत म्हटलें, तात्या, तुझ्या अल्पवयी मेंदूला त्रास करणाऱ्या कविता करूं नकोस. जा दुसऱ्या कविता कर—नाहींतर पुस्तकें वाच. यापुढें वडिलांदेखत अशा कविता करतां येईनात म्हणून तो पहांटे अंथरुणावर अभ्यासाचे निमित्तानें उठून कविता करी व त्या पाठ करून ठेवी.

* * * * *

प्लेगची धामधूम मी म्हणत होती! जिकडे तिकडे प्रेतयात्रा—प्रेतें—आप्तांची पळापळ सारखी चालली होती. प्रेत घरांत पडतांच दाराशीं सरकारी पोलिस उभे! घरांत पाडापाड करून सामानाची नासधुस करून जाळून नंतर मग ते जात. तोच दुर्धर प्रसंग याही कुटुंबावर ओढवला. कारण या मुलांचे वडील दामोदरपंत प्लेगला बळी पडले. पोलिस आले

आणि त्या दोन भावांना त्यांनीं वेगळें काढलें. धाकटा भाऊ ९।१० वर्षांचा बाळ पण प्लेगनें पछाडला. घरांत पाडापाड केली ! सामान जळूं लागलें ! सर्वजण म्हणाले, लहान मुलगा तर मरणारच ! पडूंद्या त्याला येथेंच तुम्ही मात्र आपला जीव संभाळा म्हणजे झालें. त्यावेळीं गणेशपंत म्हणाले कीं, "माझा धाकटा भाऊ अशा आसन्नमरण स्थितींत असतांना मी एक रेंसभर सुद्धां येथून हालणार नाहीं." तें आसन्नमरण बालक ज्याच्या तोंडांतून रक्त व फेंस गळत होतीं त्याच्या लटकळलेल्या मानेला सांवरित सांवरित खांद्यावर टाकून ते १९ वर्षांचे गणेशपंत आपल्या भावासह व लहानग्या पत्नीसह गांवाबाहेर एका रानांत निघून गेले. तेथें एका पडक्या पडवीचा त्यांनीं आश्रय केला. रात्रीं बेरात्रीं त्यांना भीति वाटे. कारण सोबतीला कोणीहि नाहीं. सोबतीकरतां एक कुत्रें मात्र रात्रंदिवस येऊन बसे, कां कोणाला ठाऊक ?

त्यावेळेस गणेशपंताच्या शाळेंतील एक मित्र श्री. रामभाऊ दातार हे फार उपयोगी पडले. त्या संकटांत जमलेल्या त्या दोन घराण्यांचा लोभ आजपर्यंत कायम आहे. त्यांचे साह्यानें ते नाशिकास आले व सरकारी हास्पिटलांत प्लेगनें आसन्नमरण झालेल्या आपल्या धाकट्या भावास घेऊन गणेशपंत शुश्रूषेस जाऊन राहिले तों त्यांसहि प्लेग झाला ! आतां घरीं केवळ मधला भाऊ ( विनायकराव ) व त्याची वडील भावजय हीं उरलीं. हास्पिटलमध्यें कपडे अन्न इत्यादि देण्यास जातांना शहराचे मार्गावर प्रेतें, प्रेतयात्रा व तीं ओसाड पडलेलीं घरें यांच्या मधून रात्रीं बेरात्रीं जातां येतां त्या किशोरास भीति वाटे. पण ती मनांतले मनांत दाबून तो घरीं वहिनीस व हास्पिटलांत उभयतां भावांस सांभाळित होता.

* * * * *

ईश्वरकृपेनें प्लेगमधून ते दोघे भाऊ बचावून घरीं आले. परंतु त्यांचे येण्याचे आधींच त्या किशोरानें असल्या कौटुंबिक आपत्तींतही आपलें

देशभक्तीचें कार्य नाशिकला आरंभिलेलेंच होतें ! प्लेगच्या हॉस्पिटलमध्येंच एका थोरमनाच्या देशभक्ताशीं दळणवळणाला आरंभ होऊन त्या किशोरानें देशसेवा करण्याचा निश्चय केला होता तो सिद्धीस नेण्याकरितां मंडळी शोधूं लागला. पांच सहा सभासद मिळतांच त्यांनीं संस्था स्थापली व सरकारी संशयास बळी पडूं नये म्हणून एक अगदीं साधें असें तिला नांव ठेवलें. तें " मित्रमेळा " हें होय. मित्रमेळ्याचें ध्येय सरकारी रिपोर्टांतून असें दिलेलें आहे कीं " परवशतेची बेडी तोडून टाकून हिंदुस्थान देशास परदास्यमुक्त व स्वतंत्र करण्यासाठीं अवश्य त्या सर्व उपायांनीं झुंजावयाचें शक्य तर शांततेनें तें अशक्य म्हणून दंडानें " ( रौलट रिपोर्ट पहा. )

* * * * *

त्या गुप्त संस्थेचीं गुप्त कार्यें काय काय होतीं तें अजून गुप्तच आहे. उघड रीतीनें ती काय कार्यें करीत आली तीं सर्वचीं सर्व निर्देशिण्याचें हें स्थल नव्हे. किंवा त्या संस्थेचे उद्देश वा चळवळी आणि साधनें कितपत योग्य वा अयोग्य वा उपेक्षणीय होतीं हें ठरविण्याचेंही हें स्थल नव्हे.

* * * * *

ह्या मूठभर सतरा अठरा वर्षांच्या तरुणांनीं नाशिकला अशी एक शक्ति उत्पन्न केली कीं, तिचे बळाचा व तेजाचा परिणाम अवघ्या भारतखंडांत ज्ञात झाला. ह्या तालमींत कसलेल्या तरुणांतून असले असले कवि, व्याख्याते, कार्यकारी व तपस्वी उत्पन्न झाले कीं, त्यांच्या अनवरत प्रयत्नानें प्रथम महाराष्ट्र व नंतर लंडनहून उभा हिंदुस्थान त्यांच्या नांवानीं दुमदुमुन गेला. त्यांच्यांत कांहीं तर देशाचें व स्वातंत्र्याचें वेड लागून भयंकर कृत्यें करून फांसावरही लटकले, कांहीं तुरुंगांत सडून मेले ! अशी स्वार्थाची होळी करविणारी व स्वदेहाला तुच्छ मानणारी उद्दीप्त देशभक्ति ह्या मंडळीनें महाराष्ट्रीय तरुणांचे अंगांत उद्दीपित केली.

* * * * *

या मंडळाचा आत्मा अखेरपर्यंत तोच किशोर होता कीं, ज्यानें पंधरावे वर्षी भगूरास देवीपुढें एकांतांत ती प्रतिज्ञा केली होती. नाशिकच्या सर्व प्रकाश्य संस्था एक दोन वर्षांतच त्याच्या चालकत्वाखालीं चालू लागल्या. नाशिकचा शिवोत्सव, नाशिकचा गणपत्युत्सव, नाशिकचे मेळे, नाशिकचीं पदें, नाशिकचें वक्तृत्व, हीं उभ्या महाराष्ट्रांत एकाएकीं एका विशिष्ट तेजानें झळकूं लागलीं. त्या वेळेस हिंदुस्थानांत गाजत असलेल्या स्वदेशी बहिष्काराच्या चळवळीचें बीज पेरण्यासाठीं व फैलाव करण्यासाठीं ह्या मंडळीनें व तीन तरुणांनीं अश्रांत श्रम घेतले. तो किशोर तर एक एका दिवशीं हजार हजार लोकांचे समुदायासमोर तीन तीन निरनिराळ्या सभां-तून प्रमुख व्याख्यानें देई. त्याच्या व्याख्यानांत श्रोते तल्लीन होऊन त्यांच्या भावभावनेनुसार डुलत असत.

* * * * *

शाळेंतील परिक्षेंतही तो कधीं अनुत्तीर्ण झाला नाहीं. त्याला वाचनाची अत्यंत अभिरुचि असे. इतिहासावर मराठी वाङ्मयांतील सर्व ग्रंथ त्यांनीं अनेकदां वाचले. बडोद्याच्या राष्ट्रकथामालेंतील पुस्तकांचा व अन्य ग्रंथांचा अभ्यास करून जगांतील पुरातन आसीरिया बाबिलोनिया इत्यादि देशांच्या इतिहासावरून तों थेट आजपर्यंतच्या इतिहासापर्यंत त्यानें उत्कृष्ट ज्ञान संपादन केलें. मोरोपंत, वामन, रामदास, मुक्तेश्वर इत्यादि मराठी कवींचे ग्रंथ त्याच्या इतके परिचयाचे होते कीं, त्यांवर तुलनात्मक सुंदर व्याख्यानें तो मोठमोठ्या सभांतून देई. मोरोपंताच्या हजारों आर्या त्यास मुखोद्गत असत. वक्तृत्वोत्तेजक सभांतून नाशिक, कर्जत इत्यादि ठिकाणीं त्याला पंधराव्या वर्षीच पहिलीं पारितोषिकें मिळालेलीं होतीं. कवितेंतही महाराष्ट्रीय चढाओढींतही त्यास लेखनोत्कर्षासाठीं पहिलीं पारितोषिकें मिळालीं. तो त्याच वयांत नाशिकच्या पत्रांतून व प्रसंगीं पुण्याच्या ' काळांतूनही ' लेख लिही. वर्तमानपत्रांत ' काळ ' त्याला फार प्रिय असे.

* * * * *

१९०१ सालीं तो किशोर म्याट्रिक होऊन पुण्यास फर्ग्युसन कॉलेजमध्यें गेला. लवकरच तेथील रेसिडेन्सीची शांतता मोडून अनेक उलाढाली व्हावयास आरंभ झाला. तत्त्वप्रेमानें बद्ध, ध्येयनिष्ठेनें स्फूर्त व पारस्परिक स्नेहानें एकजीव झालेलें तरुणमंडळ आपले भोंवतीं जमवून त्यानें कॉलेजांतील प्रत्येक संस्था आपल्या तेजाचे मुशींत ओतून काढण्यास आरंभ केला. रेसिडेन्सींतील तरुणांना त्या ' सावरकर क्यांप ' मध्यें आपला प्रवेश व्हावा म्हणून स्पृहा उत्पन्न होई. डिबेटिंग क्लब, भोजनाचे क्लब, संमेलनें, ग्रंथालयें इत्यादि संस्था सावरकर क्यांपच्या हातीं जाऊन प्रत्येकींत स्वातंत्र्याचा व देशभक्तीचा उपदेश रात्रंदिवस चालू असे. भोजन क्लबमध्यें साप्ताहिक सुरू झालें व त्यांत सावरकर क्यांपचे देशभक्तीचे व साहित्य, शास्त्र, कविता, विनोद यावरचे उत्कृष्ट लेख येऊं लागले. त्यांपैकीं कित्येक नंतर पुण्याच्या प्रमुख पत्रांतूनही प्रसिद्ध होत असत. डिबेटिंग क्लबमध्यें नाना देशांच्या स्वातंत्र्यसंपादनाच्या इतिहासावर सावरकर क्यांपमधील वक्त्यांचीं भाषणें होत. पुढें सर्वतोमुखीं झालेलें व अजून कित्येक लोकांच्या तोंडीं असलेलें " राष्ट्रीय सप्तपदी " हें व्याख्यान सावरकर यांनींच क्लबमध्यें दिलेलें होतें. परतंत्र देशांतील लोकांस स्वातंत्र्यसंपादन करतांना ज्या सात पायऱ्या चढाव्या लागतात त्या त्यांनीं अनेक ऐतिहासिक दाखले देऊन या व्याख्यानांत विशद केल्या होत्या. भोजनालयांतून शिवाजीची छबी लावण्यांत येऊन प्रति शुक्रवारीं तिची मोठी पूजा व आरती व मंत्रपुष्पांजली होई. आरती सावरकरांनींच रचलेली असल्यानें ती कशी होती हें सांगणेंच नलगे.

---

## श्रीशिवरायांची आरती.

आर्यांच्या देशावरि म्लेंच्छांचा घाला ।
आला आला सावध हो शिवभूपाला ॥
सद्गदिता भूमाता दे तुज हांकेला ।
करुणारव भेदुनि तव हृदय न कां गेला ॥
जयदेव जयदेव जय जय शिवराया ।
या या अनन्यशरणा आर्या ताराया ॥ धृ० ॥

२

श्रीजगदंबा जीस्तव शुंभादिक भक्षी ।
दशमुख मर्दुनि जी श्रीरघुविर संरक्षी ॥
ती पूता भूमाता म्लेंच्छांहीं छळितां ।
तुजविण तिज शिवराया कोण दुजा त्राता ॥ जयदेव० ॥

३

त्रस्त अम्हीं दीन अम्हीं शरण तुला आलों ।
परवशतेच्या पाशीं मरणोन्मुख झालों ॥
साधुपरित्राणाया दुष्कृति नाशाया ।
भगवन् ! भगवद्गीता सार्थ कराया या ॥ जयदेव० ॥

४

ऐकुनियां आर्यांचा धावा महिवरला ।
करुणोक्तें स्वर्गी श्रीशिवनृप गहिंवरला ।
देशास्तव शिवनेरीं घेई जन्माला ।
देशास्तव रायगडीं ठेवी देहाला ॥
देशस्वातंत्र्याचा दाता जो झाला ।
बोला तत् श्रीमत् शिवनृपकी जय बोला ॥ जयदेव० ॥

## रंग.

धन्य कुलामाधिं धनी सवाई भाग्य धन्यची रायाचे ॥
सेवक हातीं यशस्वि असती पुण्य किती त्या पायांचे ॥ १ ॥
रजपूतादि शूर रिपूही श्रीमंतांनां शरण अले ॥
मोंगलपतिनीं शरण येउनी वजिरपदासी अर्पियले ॥ २ ॥
जिकडे तिकडे नाम पेशवे काळ शत्रुशीं वाटुनिया ॥
प्रजेंत झाली बहु शांतता रिपू सर्वही हाटुनिया ॥ ३ ॥
नाच शिकारी रंग तमाशे प्रजेंत होती नित्य महा ॥
श्रीमंतांनीं बेत ठरविला रंग कराचा असा पहा ॥ ४ ॥
सरकारांनीं सरदारांनीं सर्व जनांनीं दूरस्ती ॥
रंग करुनियां ठीकठिकाणीं केलि सुशोभित ती वस्ती ॥ ५ ॥
पागे पथके मानकरी आणि कारभारी हे सरदारा ॥
श्रीमंत प्रभु माधवरायासहीत आले दरबारा ॥ ६ ॥
ज्यांनीं रोवुनि महाप्रतापें जरि पटक्याशीं अटकेला ॥
त्यांची स्वारी तेथें आली श्रीमंतांनां न्यायाला ॥ ७ ॥
उडूं लागले गुलाल पल्ले हौद खपविले फौजेनें ॥
रंगाची अशि खेळुनि स्वारी वाड्यामध्यें मौजेनें ॥ ८ ॥
नंतर स्वारी तिसरे प्रहरीं शहरिं निघाली थाटानें ॥
वाडा डावा घालूनि गेली बुधवाराच्या वाटेनें ॥ ९ ॥
पुढें विकसली मुख्य स्वारि मग मागें थाट अंबाऱ्यांचा ॥
चंद्रबिंब श्रीमंत अवांतर प्रकाश पडला ताऱ्यांचा ॥ १० ॥
पिचकाऱ्यांचा मार जाहला फार तेधवां बुधवारीं ॥
स्वारी कापड आळींतूनी खेळत आली रविवारीं ॥ ११ ॥
हरिपंताच्या वाड्यापाशीं रंग केशरी उडवुनियां ॥
स्वारी गेली नाकझरींतुन रंगचीखला तुडवुनियां ॥ १२ ॥
रास्ते यांच्या पेठेमध्यें पाट लागले रस्त्यांनीं ॥
गच्च्यांवरुनि बंब लावुनी रंग उडविला रास्त्यांनीं ॥ १३ ॥

शहरिं भिजविले कैक बंगले चौक गुलालें रंगांनीं ॥
द्वापारिं जसें वृंद भिजविले भगवान श्रीरंगांनीं ॥ १४ ॥
सलाम मुजरे सर्व राहिले दंग जाह्ले रंगांनीं ॥
द्वापारीं जसे रंग करविले भगवान श्रीरंगांनीं ॥ १५ ॥
झुकत झुकत समुदाय चालले स्वारि आलि मग वानवडीं ॥
नंतर रंगा अरंभ झाला नाच होऊनी दोन घडी ॥ १६ ॥
खपूं लागले गुलाल पडे पिचकाऱ्यांचा मार अती ॥
झालिरे झाली गर्दी एकची वर्णावी ती पहा किती ॥ १७ ॥
मुठी मुठी मग गुलाब भरिती लाल लाल छत बुंदांत ॥
हास्यवदन मग राव शोभती शूर शिपाई फंदांत ॥ १८ ॥
अगणित तेव्हां सकल जनांवरि पाउस पडे पिचकाऱ्यांचा ॥
असह्य झाला मार तेधवां बंबाच्या फटकाऱ्यांचा ॥ १९ ॥
अवर्णनिय बहु रंग खेळुनी उठले स्नानाशीं जाया ॥
अगणित तेव्हां तापुं लागल्या सुगंधि पाण्याच्या कढया ॥ २० ॥
वेगवेगळीं सुगंध तेलें रायाशीं लावायाला ॥
उभे राहिले ब्राम्हण घेउनि घालाला हो न्हायाला ॥ २१ ॥
अवर्णनिय बहु थाटानें कीं झालीं सर्वांचीं स्नानें ॥
सर्वांशीं मग वाटुनि दिधलीं अगणित वस्त्रें शिंद्यानें ॥ २२ ॥
नवीं लेउनीं पुनरपि वस्त्रें येती सर्वाहि दरबारा ॥
नाच जाहला सुरूं होउनि पानसुपारी हार तुरा ॥ २३ ॥
मग शिंद्यानें श्रीमंतांनां शिरपेंच तुरा आदि अर्पियलें ॥
तसेंच साऱ्या जनाशिं देखा अमोल पोषाखा दिधलें ॥ २४ ॥
नंतर स्वारी उलट निघाली तिन घटिका रात्रीं ॥
स्वारिंत तेव्हां येती बरोबर नानादि मंत्री ॥ २५ ॥
शोभा बघती गाड्यावरुनी चिराकदानें लावुनियां ॥
अति गजरानें स्वारी येती वाड्यामध्यें घेउनियां ॥ २६ ॥

---

# प्रकरण ३ रें.

## फर्ग्युसन कॉलेज आणि पुण्यांतल्या चळवळी.

याप्रमाणें फर्ग्युसन कॉलेजमध्यें विद्यार्थ्यांच्या सबंध आयुष्यक्रमामध्यें विलक्षण स्थित्यंतर करून विनायकरावांनीं त्यांना चैनी, ऐषआरामी, टेनिस-कोर्टें, चहापार्टी, सिगारेट वगैरे गोष्टींच्या पंकांतून काढून देशभक्ति, विद्वत्ता, वक्तृत्व, कवित्व या उज्वल सद्गुणांकडे ओढून घेतलें. यानंतर अशा एकाच ध्येयानें, आवडीनें, प्रेमानें एकत्र केलेल्या मित्रमंडळामध्यें संघटन करण्याचा विनायकरावांनीं उपक्रम केला. कारण विस्कळीत पसरलेल्या अनेक सामर्थ्यवान् माणसांपेक्षांहि संघटित असलेलीं थोडीं माणसेंहि अधिक कार्य करूं शकतात, हें विनायकराव जाणून होते व म्हणून कुठेंहि ते गेले तरी त्यांनीं संघटनाचे प्रयत्न अखंड चालविले. त्याचप्रमाणें फर्ग्युसन कॉलेजमध्येंही त्यांनीं या सर्व तरुण मित्रमंडळाचें संघटन आरंभिलें. फर्ग्युसन कॉलेजची समोरील टेकडी म्हणजे सावरकरांचें क्रीडांगण होऊन राहिलें. ज्यावेळीं सावरकरांचे इतर सहचर आपल्या फुलरंगी तारुण्याचे दिवस चैनीच्या छानछबेल्यांत व्यर्थ घालवीत असत त्यावेळीं सावरकर व त्यांचे अनुचर या टेकडीवर एका खबदाडांत एक जें महादेवाचें देवालय आहे त्यामध्यें देशभक्तीच्या जळानें सुस्नान होऊन स्वराज्य देवीला प्रसन्न करण्याकरतां सर्वस्वाचें बलिदान करण्याचे निश्चय करतांना दिसत होते. हे निश्चय कसे तडीला जातील, हे उद्देश कसे साध्य होतील याचा गंभीर विचार करण्यांत या ठिकाणीं कितीतरी वेळां ही मंडळी गढून गेलेली असत. नवीन नवीन तरुण या एकजीव झालेल्या सावरकर कँपकडे आकर्षिले जात. नाना विषयांवर तेथें विद्वत्तापूर्ण अशीं भाषणें होत व पूर्व-

कालीन इतिहास व सद्यःकालीन हीनस्थिती यांचीं हुबेहुब चित्रें सिनेमा-प्रमाणें या तरुणांच्या मनःपटलावर सावरकर आपल्या अमोघ वाणीनें, हृदय हलवून सोडणाऱ्या वक्तृत्वानें उमटवून देत असत. मधून मधून ही मंडळी जवळ पासचे किल्लेकोट पहावयास सफरी काढीत. एकदां सिंहगडावर अशीच सफर गेली असतां विनायकराव यांनीं तानाजीच्या चरित्रावर एक वक्तृत्वपूर्ण भाषण केलें. 'व तें आजही मला जसेंच्या तसेंच आठवत आहे.' असें त्यांचे एक स्नेही आम्हाजवळ म्हणाले.

* * * * *

पण फर्ग्युसन कॉलेजमध्यें या तरुण मंडळाच्या या उलाढाली चालल्या असतां त्यांच्या चालकांच्या दृष्टींतून हा तरुण कसा वगळला गेला ? तो वगळला मुळींच गेला नाहीं. पहिले वर्षीच त्याचें वर्तन पाहून प्रोफेसरांस शंका वाटली—दुसरे वर्षी भीति—तिसरे वर्षीतर सादर द्वेष. सादर यासाठीं कीं सावरकर क्यांपमध्यें अभ्यासाचे व परीक्षा उतरण्याचे कामीं प्रत्येकाचा हातखंडा असे. व्यायामांत, वक्तृत्वांत, सच्छीलतेंत, दुःखितांस सहाय्य देण्यांत—सर्व सद्गुणांत ती मंडळी पुढें असत. ते वेष एकसारखा व स्वदेशीच करीत. ते जिवास जीव देणारे मित्र होते. एकच दुर्गुण त्यांच्यांत असे कीं, त्यांच्या प्रोफेसरांस न पटेल इतका जाज्वल्य स्वदेशाभिमान व तो कृतींत उतरविण्याची अत्युत्कट लालसा व प्रयत्न ! त्या योगानें सावरकरांवर सर्व चालकांचा डोळा असे. प्रो. पटवर्धन म्हणत "He is bound to be a great demeyogue." (तो एक मोठा चळवळ्या लोकाग्रणी होईल.)

* * * * *

सावरकर क्यांपचा प्रभाव केवळ रेसिडेन्सींतच थांबणें शक्य नव्हतें. कॉलेजमध्यें महाराष्ट्रांतील भावी पिढीचे नेते एकत्र जुळत असल्यानें त्यांच्या विचारांस व कृतींना वळण लागणें म्हणजे उभ्या महाराष्ट्राचें भविष्य घडविणें होय असें सावरकर आपल्या मंडळीस वारंवार सांगत व म्हणून जरी कॉलेजांतील येत्याजात्या तरुणाशीं वादविवाद करण्यांत त्यांचा वेळ खर्च होई तरी ते पुण्याच्या सार्वजनिक चळवळींतही भाग घेऊन आपल्या

विचारांचीं माणसें एकत्र करीत होतेच. अशा एका प्रसंगीं एका मोठ्या स्वदेशी सभेंत आहे त्या विलायती कापडाचें काय करावें असा प्रश्न उठला. तेव्हां सावरकरांनीं उठून सांगितलें कीं, त्या सर्व कापडाची आतांचे आतां होळी करून कृतकर्माचें प्रायश्चित्त घ्यावें !

* * * * *

ती कल्पना पुण्यांतील एका पुढाऱ्याविना कोणासही पटली नाहीं. ते पुढारी म्हणजे प्रो. शिवरामपंत परांजपे होत. पण सावरकरांशीं अर्धा तास वादविवाद होतांच दोघां तिघांनीं वचन दिलें कीं, लोकांत इतका उत्साह जर पैदा होत असेल कीं होळीसाठीं निदान अर्धी गाडी तरी कपडे एकत्र होतील तर आपण होळीला पाठिंबा देऊं. " " तें काम माझें " सावरकर म्हणाले व त्वरित आपल्या गोटांत तें वर्तमान सांगून पुण्यांतील विद्यार्थ्यांच्या दोन सभा भरविल्या. सावरकराचे वक्तृत्वाचा आतां पुण्यासही इतका लौकिक झाला होता कीं, श्रोत्यांच्या झुंडी लोटत. व्याख्यानाच्या पूर्ण भरांत सावरकरांनीं आव्हान केलें कीं " फेका विलायती कपडे अंगावरून ! आपण त्यांची व त्याबरोबरच त्या संवयीची राख करून टाकूंया ! " या आव्हानासरशी कोणी टोपी, कोणी उपरणें, कोणी कोट जें ज्यापाशीं होतें तें पटापट फेकूं लागले ! बोलतां बोलतां पुरुषभर ढीग पडला ! मग ज्यांना शंका होत्या त्यांच्याही मावळल्या. एका पुढाऱ्यानें म्हटलें " पण हा आर्थिक शास्त्राच्या दृष्टीनें तोटा आहे. " त्वरित सावरकरांनीं उत्तर दिलें " पण नीतिशास्त्राच्या दृष्टीनें तो लाभ आहे. या कपड्यांस पेटतांना पाहून मनांत जी देशभक्तीची ज्योत पेट घेईल तिच्या नैतिक परिणामाचा लाभ हा ह्या हानीहून अनेक पटीनें अधिक भरेल ! "

* * * * *

गाड्यांवर ते परदेशी कपड्यांचे ढीग रचले गेले. वर गुलाल शिंपडून पुढें बाजे, ब्यांड, ताशे, चौघडे लावून एखाद्या महामारीचा बळी काढावा तसा तो विलायती कपड्याचा ढीग मध्यें घालून ती मिरवणूक निघाली.

रेमार्केटपासून वाजत गाजत थेट लकडी पुलाकडील शेतांत लोक आले. सावरकरांच्या गोटांतील मंडळी सज्ज होतीच. तावडतोब त्यांनीं मोठी होळी रचली. लोकमान्यही मिरवणुकींत मध्यंतरीं आलेले होते. काळकर्ते प्रथमपासूनच होते. सावरकरांनीं विनंती केली कीं, होळी पेटली असतां तीभोंवतीं वर्तुळ रचून तिथें त्या जाळासमोर व्याख्यान व्हावें. लोकमान्य म्हणाले, आतां कार्य झालें इतकेंच पुरे. होळी तिकडे पेटूं द्या. व्याख्यान इकडेच देऊं. पण सावरकरांनीं आग्रह धरला कीं, " मग येथपर्यंत तरी येण्याचें काय कारण ? व्याख्यान रेमार्केटांत व होळी इकडे करतां आली असती. पण हा प्रचंड विलायती कापडाचा ढीग भडकत असतां त्या ज्वाळांच्या लोळासमोरच भावनांचेही कल्लोळ उडविणारें व्याख्यान झालें तर तें दृश्य हे संस्कार मनावर जास्त ठसवूं शकतील. लोकमान्य म्हणाले, बरें तसें कां होईना. मग त्या दिवशीं होळीवर शिवरामपंतांचें उत्कृष्ट व्याख्यान झालें. एक विलायती कोट होळींतून खेचून त्यांनीं त्याचे खिशांत किती हिंदुस्थानी द्रव्य चोरून नेलें त्याची झडती घेतली. व नंतर त्या फसवणुकीचें प्रायश्चित्त म्हणून त्यास " होळींत भस्म हो ! " म्हणून त्या कडकडणाऱ्या अग्नीत फेंकून दिलें. लोकमान्यांनींही मोठें उत्साहवर्धक भाषण केलें. रात्रीं ८ चे सुमारास तो समूह परतला. लोकमान्य म्हणाले, " सावरकर संभाळाहो पोलीस चिडलें आहे. पलीकडे गवताच्या गंज्या आहेत. नाहीं तर ठिणगी तेथें पाडून म्हणावयाचे कीं, होळीवाल्यांनीं गवत जाळलें ! ! " सावरकरांनीं सांगितलें आम्ही होळी संपूर्ण विझेपावेतों येथून हलणार नाहीं ! आपण निश्चिंत असावें. त्या रात्रीं सावरकरांनीं आपले दोन विश्वासू मित्र तेथें पहाऱ्यास ठेवून, राख झाल्यावरही ती पोतेरे आणवून विझवून टाकविली.

* * * * *

ही हिंदुस्थानांत विलायती कपड्यांची पहिली प्रचंड होळी होय ! अमृतबझार, बंगाली, हिंदु अशा दूरदूरच्या पत्रांतून तिचा उजेड पडला होता. टीका प्रतिटीकांचा धूर तर महिनाभर निघत होता.

* * * * *

पण सावरकर रेसिडेन्सींत परत येऊन पहातात तों तिकडेही एक होळी पेटलेली होती! ही कपड्यांच्या आगीची नसून चालकांच्या शांतीची होय. थोडेच दिवसांत प्रि. परांजपे यांनीं सावरकरांस बोलावून, स्वदेशीमध्यें भाग घेण्याच्या व होळींत पुढाकार स्वीकारण्याच्या अपराधाविषयीं रेसिडेन्सींतून ' रस्टिगेट ' बहिष्कृत केलें. व दहा रुपये दंडही ठोठावला! सावरकर त्यावेळेस कॉलेजच्या शेवटच्या परीक्षेत उत्तीर्ण होऊन नुक्तेच बी. ए. साठीं फार्म भरून युनिव्हर्सिटींत धाडून आले होते. त्यांची नेहमींची रीति म्हणजे वर्षभर अव्याहत स्वदेशधर्माचे उपदेशकार्यांत रखडून परिक्षेच्या आधींचे दोन महिने तेवढे अभ्यासांत राखून ठेवावयाचे. त्या दोन महिन्यांत ते इतका कसून अभ्यास करीत कीं, प्रत्येक वर्षीं हटकून ते उत्तीर्ण होत. पण आतां त्याचवेळीं हें संकट उद्भवलें! दंड झाला व कालेजमधून काढून टाकलें. हें ऐकून युनिव्हर्सिटीही कदाचित बी. ए. स बसूं देणार नाहीं! क्वचित् पुढील सर्व आयुष्याचा रंग एकदम बदलून जाणार! क्वचित् आजपर्यंत केलेल्या खर्चाची व कुटुंबांतील सर्व माणसांस आपल्या उत्कर्षाविषयीं असणाऱ्या आशेची अशी धूळधाण होणार! पण प्रि. परांजपे म्हणाले, संध्याकाळचे आंत रेसिडेन्सी सोडून चालते व्हा!' सावरकर रेसिडेन्सी सोडून चालते झाले. त्यांचे मागें तीं शिवाजीचीं चित्रें काढून टाकण्यांत आलीं. तीं लिखित साप्ताहिकें बंद करण्यांत आलीं. त्यांच्या गोटास पूर्वी युध्यमान पक्ष करीत त्याप्रमाणें लुटून फस्त करून उधळून टाकण्यांत आलें.

* * * * *

हा हिंदुस्थानांत स्वदेशी चळवळीस बळी पडलेला पहिला विद्यार्थी होय. इंदुप्रकाशानें लिहिलें कीं, त्यास बळी दिला हें ठीकच झालें. "He was an ill tongned messenger of extremism from the very start." पहिल्या पासूनच त्याची जिव्हा म्हणजे जहाल पक्षाची एक अशुभ ज्वलजिव्हा होती.

---

# प्रकरण ४ थें.

## बी. ए. ची परिक्षा व अभिनवभारताला मूर्त स्वरूप.

फर्ग्युसन कॉलेजच्या अधिकाऱ्यास या कृत्याविषयीं केसरीनें सणसणीत प्रत्युत्तर दिलें कीं, "हे आमचे गुरूच नव्हत !" बहुतेक नेमस्त पत्रांनीं विद्यार्थ्यांनीं राजकीय चळवळींत पडूं नये म्हणून मत दिलें. बहुतेक राष्ट्रीयपक्षीय पत्रकारांनीं सावरकरांचें समर्थन केलें. त्यांस झालेला दंड भरण्यासाठीं सार्वजनिक फंड उभारण्यांत आला. त्यांतून दंडाचे दहा रुपये देऊन बाकी पैसे सावरकरांनीं पैसाफंडास देऊन टाकले. त्याच गर्दीत पुण्याहून तेथेंच अभ्यास करून ते बी. ए. ची परीक्षाही पण जेव्हां उतरले तेव्हां महाराष्ट्रांतील अनेक लोकांकडून सार्वजनिक अभिनंदनपर पत्रें आलीं.

*    *    *    *    *

बी. ए. होतांच अधिक नेटानें त्यांनीं प्रचाराचें कार्य हातीं घेतलें. त्यांच्या कविता आतां महाराष्ट्रांत सर्वांचे मुखीं झालेल्या होत्याच. त्यांनीं केलेला सिंहगड व बाजी देशपांडे यांचा पोवाडा तर अजूनही सर्वतोमुखीं आहेच. त्यांच्या वक्तृत्वाचा लौकिक दूर दूर पोंचून नगर, पुणें, मुंबई, डहाणू, कल्याण अशा कित्येक शहरांतून त्यांचीं व्याख्यानें आमंत्रणें धाडून करविण्यांत आलीं. जेथें जेथें ते जात तेथें तेथें "सभा व्याख्यानासह आपल्या गुप्त संस्थांच्या शाखाही पसरवीत जात असे," असें रिपोर्टस् म्हणतात. या रिपोर्टांवरूनच या सर्व चळवळीनें सावरकरावर वॉरंट सुटलें आहे अशी दाट वदंता उठली.

*    *    *    *    *

आपल्यावर वॉरंट सुटलें हें ऐकून तें केव्हां येतें याची मार्गप्रतीक्षा करीत सावरकर हे मुंबईला बी. ए. एल्. एल्. बी. चे अभ्यासाकरितां १८९६ व्या वर्षी येऊन राहिले. आतां त्यांस इच्छा झाली कीं, कॉलेजमध्यें जशी महाराष्ट्राची पिढीच्यापिढी एका झटक्यासरशी एकाचवेळीं बदलतां आली तशीच हिंदुस्थानचे भावी नेते जर कुठें एकावेळीं एकत्र गांठण्याचें स्थळ असेल तर लंडन होय. तेथें सर्व हिंदुस्थानांतील बुद्धीनें व द्रव्यानें समर्थ असलेले तरुण बहुतेक जमतात व तेथून परत आल्यावर समाजाचे नेते व धुरीण बनतात. तर तेथें अत्युच्च स्थलींच प्रकाश पडल्यास तो आजूबाजूस दूरवर सहजच पसरेल. आणखी युरोपीय क्रांतिकारक व इतर संस्था अवलोकन करून त्यांची साधनें शिकतां व जुळवितां येतील. संस्थेच्या अखिल भारत वर्षीय कार्यक्रमास पूर्ण करण्यास शक्य तर लंडनला जावें असा त्यांनीं बेत केला. इतक्यांत इंग्लंडमध्यें "होमरूल" संस्थेचे सूत्रधार पंडित श्यामजी कृष्ण वर्मा यांनीं परदेशप्रवासास उत्तेजन देण्याकरितां दोन तीन स्कॉलरशिपा ठेवल्याचें आपल्या 'इंडियन सोशियालिस्ट' पत्रांत प्रसिद्ध केलें. व होतकरू इच्छुकांकडून अर्ज मागितले. विनायकरावांनीं पण एक अर्ज धाडला व त्यांस लोकमान्यांनीं व काळकर्ते यांनीं प्रशंसापत्रें जोडलीं. थोडेच दिवसांत "शिवाजी" स्कॉलरशिप मिळून विनायकरावांचा बिलायतेस जाण्याचा बेत ठरला.

* * * * *

मध्यंतरीं पुण्यास एक स्वदेशी प्रचारांत लक्ष घालणारे स्वामी अगम्यगुरू नांवाचे पुरुष येऊन व्याख्यानें देऊं लागले. त्यांनीं पुण्यांतलि विद्यार्थ्यांना संघटित करण्यासाठीं कांहीं पुढाऱ्यांस निवडून मजकडे धाडा असें सांगितलें. तेव्हां पुणेंकर विद्यार्थ्यांनीं मुंबईस सावरकर यांस परांजप्यांचे नांवें तार दिली. सावरकर पुण्यास तांतडीनें येतांच विद्यार्थ्यांची एक मोठी सभा भरली व यांत पंचाचे प्रमुख नेमून अगम्य गुरूकडे धाडण्यांत आलें. तेथें कांहीं तास शुष्क संवाद होऊन पुन्हां पुढें पाहूं म्हणून 'गुरु' उठून गेले. बस्स, हाच व

# प्रकरण ४ थें.

## . ए. ची परिक्षा व अभिनवभारताला मूर्त स्वरूप.

सन कॉलेजच्या अधिकाऱ्यास या कृत्याविषयीं केसरीनें सणसणीत दिलें कीं, "हे आमचे गुरूच नव्हत !" बहुतेक नेमस्त पत्रांनीं नीं राजकीय चळवळींत पडूं नये म्हणून मत दिलें. बहुतेक ीय पत्रकारांनीं सावरकरांचें समर्थन केलें. त्यांस झालेला दंड ठीं सार्वजनिक फंड उभारण्यांत आला. त्यांतून दंडाचे दहा रुपये की पैसे सावरकरांनीं पैसाफंडास देऊन टाकले. त्याच गर्दीत तेथेंच अभ्यास करून ते बी. ए. ची परीक्षाही पण जेव्हां उतरले राष्ट्रांतील अनेक लोकांकडून सार्वजनिक अभिनंदनपर पत्रें आलीं.

* * * *

होतांच अधिक नेटानें त्यांनीं प्रचाराचें कार्य हातीं घेतलें. ता आतां महाराष्ट्रांत सर्वांचे मुखीं झालेल्या होत्याच. त्यांनीं ड व बाजी देशपांडे यांचा पोवाडा तर अजूनही सर्वतोमुखीं व्या वक्तृत्वाचा लौकिक दूर दूर पोंचून नगर, पुणें, मुंबई, ण अशा कित्येक शहरांतून त्यांचीं व्याख्यानें आमंत्रणें धाडून . जेथें जेथें ते जात तेथें तेथें "सभा व्याख्यानासह आपल्या खाही पसरवीत जात असे," असें रिपोर्टस् म्हणतात. ा सर्व चळवळीनें सावरकरावर वॉरंट सुटलें आहे

* * *

आपल्यावर वॉरंट सुटलें हें ऐकून तें केव्हां येतें याची मार्गप्रतीक्षा करीत सावरकर हे मुंबईला बी. ए. एल्. एल्. बी. चे अभ्यासाकरितां १८९६ ब्या वर्षीं येऊन राहिले. आतां त्यांस इच्छा झाली कीं, कॉलेजमध्यें जशी महाराष्ट्राची पिढीच्यापिढी एका झटक्यासरशी एकाचवेळीं बदलतां आली तशीच हिंदुस्थानचे भावी नेते जर कुठें एकावेळीं एकत्र गांठण्याचें स्थळ असेल तर लंडन होय. तेथें सर्व हिंदुस्थानांतील बुद्धीनें व द्रव्यानें समर्थ असलेले तरुण बहुतेक जमतात व तेथून परत आल्यावर समाजाचे नेते व धुरीण बनतात. तर तेथें अत्युच्च स्थलींच प्रकाश पडल्यास तो आजूबाजूस दूरवर सहजच पसरेल. आणखी युरोपीय क्रांतिकारक व इतर संस्था अवलोकन करून त्यांची साधनें शिकतां व जुळवितां येतील. संस्थेच्या अखिल भारत वर्षीय कार्यक्रमास पूर्ण करण्यास शक्य तर लंडनला जावें असा त्यांनीं बेत केला. इतक्यांत इंग्लंडमध्यें "होमरूल" संस्थेचे सूत्रधार पंडित श्यामजी कृष्ण वर्मा यांनीं परदेशप्रवासास उत्तेजन देण्याकरितां दोन तीन स्कॉलरशिपा ठेवल्याचें आपल्या 'इंडियन सोशियालिस्ट' पत्रांत प्रसिद्ध केलें. व होतकरू इच्छुकांकडून अर्ज मागितले. विनायकरावांनीं पण एक अर्ज धाडला व त्यांस लोकमान्यांनीं व काळकर्ते यांनीं प्रशंसापत्रें जोडलीं. थोडेच दिवसांत "शिवाजी" स्कॉलरशिप मिळून विनायकरावांचा विलायतेस जाण्याचा बेत ठरला.

* * * * *

मध्यंतरीं पुण्यास एक स्वदेशी प्रचारांत लक्ष घालणारे स्वामी अगम्यगुरू नांवाचे पुरुष येऊन व्याख्यानें देऊं लागले. त्यांनीं पुण्यांतील विद्यार्थ्यांना संघटित करण्यासाठीं कांहीं पुढाऱ्यांस निवडून मजकडे धाडा असें सांगितलें. तेव्हां पुणेंकर विद्यार्थ्यांनीं मुंबईस सावरकर यांस परांजप्यांचे नांवें तार दिली. सावरकर पुण्यास तांतडीनें येतांच विद्यार्थ्यांची एक मोठी सभा भरली व यांत पंचाचे प्रमुख नेमून अगम्य गुरूकडे धाडण्यांत आलें. तेथें कांहीं तास शुष्क संवाद होऊन पुन्हां पुढें पाहूं म्हणून 'गुरु' उठून गेले. बस्स, हाच व

इतकाच अगम्यगुरू व सावरकर यांचा प्रथम व अंतिम परिचय ! ही यःकश्चित् घटना येथें इतक्याकरितांच सांगावयाची कीं, रौलेट रिपोर्टमध्यें पोलिसांनीं असा शोध लाविला आहे कीं, अगम्य गुरूनें प्रथम सावरकरांना आपल्या हातीं घेऊन राजकारणाची दीक्षा व लौकिक महत्त्व दिलें ! हा भाग जेव्हां सावरकरांनीं प्रथम वाचला तेव्हां त्यांस हसूंच कोसळलें असेल !

* * * * *

आणखी एका संबंधानें या गोष्टीचा उल्लेख केला आहे. वरील सार्वजनिक सभेंत एकवीस वर्षांच्या वयांत सावरकरांनीं दिलेलें हें व्याख्यान त्यांचें पुण्यास झालेलें शेवटचें व्याख्यान होय. त्या भाषणाविषयीं पोलिसचे स्पेशल रिपोर्टर म्हणतात "It was so dexterous! So triumphant! He is at The most twenty-two, but he is already an accomplished orator of an enviable rank." हें त्यांचें पुण्याच शेवटचें व्याख्यान. त्यावर आजपर्यंत पुण्याचे जनतेस त्यांशीं व त्यांस पुण्याचे जनतेशीं बोलतां आलें नाहीं. पुढें कधीं येईल तो सुदिन !

* * * * *

मुंबईस जे कांहीं ५--६ महिने ते राहिले ते त्यांनीं तेथील कॉलेजांत आपल्या तत्त्वांचा प्रसार करण्यांत, चाळी चाळींत सभा भरविण्यांत, व आपल्या पक्षाचें 'विहारी' पत्र चालविण्यांत खर्च केले. त्यांचे लेख विहारींत येऊं लागतांच त्या पत्राच्या प्रती हजारांनीं खपूं लागल्या. इतक्यांत इंग्लंडमध्यें जावयाचें ठरलें. विलायतेंत जाण्याचे आधीं विनायकरावांनीं अनेक सहकाऱ्यांस एके ठिकाणीं जमवून त्यांचें एक संमेलनच केलें. त्यावेळीं त्या संस्थेचें नांव 'अभिनवभारत' हें ठेवलें गेलें व स्वातंत्र्यलक्ष्मीच्या जयजयकारांनीं महाराष्ट्राचें अखिल वातावरण दुमदुमून टाकलें.

* * * * *

# प्रकरण ५ वें.

## विलायतेंत प्रयाण आणि तेथील खळबळ.

हिंद देशाच्या जयजयकारांनीं लंडनमध्यें असलेल्या हिंदी तरुणांसही भारून टाकण्यासाठीं व हिंदुस्थानांतील चळवळीचा धक्का यूरोपांत पोंचवून तिकडील राष्ट्रांत हिंदुस्थानच्या आकांक्षाचा व कर्तृत्वाचा उच्चार व त्यांच्या कार्यांची प्रसिद्धी करण्यासाठीं सावरकर मुंबई सोडून विलायतेस जावयास निघाले. आपला भाऊ, माझा पति, आमचा पुढारी, आमचा जिवलग मित्र, परत येईल या आशेनें व उत्साहानें ज्या अनेक अंतःकरणांनीं त्यांस त्या दिवशीं निरोप दिला—हाय हाय ! त्यांच्या त्या सर्व वैयक्तिक आशांचें तें गलबत कर्तव्याच्या खडकावर फुटून चक्काचूर व्हावयाचें होतें !!

* * * * *

इंग्लंडमध्यें पोंचतांच एक दिवसही व्यर्थ न घालवितां सावरकरांनीं आपलें कर्तव्य कार्य आरंभिलें—नव्हे तें जलमार्गानेंही खंड पावलेंच नव्हतें कारण नौकायानावर जे हिंदी विद्यार्थी त्यांस भेटले त्यांपासूनच त्यांनीं आपल्या यूरोपमधील कार्यक्रमास आरंभ केला होता ! व तोच कार्यक्रम रात्रंदिवस अक्षरशः रात्रीचे दिवस करून व वेळीं तर भोजनासही समय न खर्च करितां चार वर्षें अव्याहत चालविला होता. त्यांतील अनेक गोष्टी व अनेक कार्यें अभिनव भारताच्या गुप्त मंडळांत घाटत व घडत असल्यानें त्यांची माहिती अद्यापपर्यंत धुक्यांतच गुरफटलेली आहे. व क्वचित् हिंदुस्थान स्वतंत्र होईपर्यंत ती तशीच राहील. त्या दिवशीं मात्र पारतंत्र्याच्या रात्रींत तिच्या ह्या निस्सीम भक्तानें व त्याच्या अन्य समर्थ सहाय्यकांनीं आपल्या मातृभूमीच्या व लोकांच्या मोचनासाठीं काय काय भयंकर वा

सौम्य, धर्म्य व आपद्धर्म्य बरे वा वाईट, उपाय योजले, कोणती व कशी अखंड व अनबरत सेवा केली व स्वार्थाची, स्वजनांची व स्वप्राणांचा चिंता न करतां एकमात्र उद्देशानें झुंजत लहानपणीं केलेल्या वाचिक प्रतिज्ञा कशा अक्षरशः कृतीनें खऱ्या केल्या तें त्या दिवशीं मात्र—कीं ज्या दिवशीं हिंदुस्थानांत पुन्हां स्वतंत्रतेचा ध्वज डोलूं लागेल त्या दिवशीं मात्र—कालास आठवण राहिली व कोणी सांगावयास उरलें तर सांगितल्या जातील !

* * * * *

इतकें मात्र खरें कीं, सावरकरांचा इंग्लंडच्या किनाऱ्यास पाय लागल्यापासून तेथील हिंदी तरुणांत अशी कांहीं विलक्षण चळवळ व वृत्तिपालट झाली कीं, विलायत सरकारलाही सावरकरांवर कडक डोळा ठेवणें प्राप्त झालें. इंग्लंडमधील टाइम्स आदीकरून सर्व मोठमोठीं वर्तमानपत्रें ह्या मिसूरही पुरती न फुटलेल्या पोरास आपला कट्टा प्रतिपक्षी समजून त्यावर अग्रलेखांतही हल्ले चढवूं लागलीं. सत्तावन सालच्या स्वातंत्र्यार्थ झालेल्या राष्ट्रीय युद्धाचा अर्ध शतकोत्सव सावरकरांनीं भर लंडनमध्यें गाजविल्यानें तर प्रकरण अगदींच चिरडीस गेलें. लंडनचें पोलिसानें सावरकरांनीं चालविलेल्या " इंडिया हाऊस " पुढें आपलें नित्याचें ठाणें दिलें. इंडिया हाउस मध्यें गुप्तरीतीनें बॉंब शिकविण्याची शाळा आहे असें ते म्हणूं लागले. रौलट रिपोर्ट व पोलिसांनीं आणलेले आरोप यांचें असें म्हणणें आहे कीं रविवारीं भरणाऱ्या " फ्री इंडिया " नांवाच्या अभिनव भारताच्या उघड सभेंत अनेक राष्ट्रीय विषयांवर विद्वत्ताप्रचुर व वाग्शाली भाषणें करून सावरकर बौद्धिक शिक्षण देऊन, रात्रीं अभिनव भारताच्या गुप्त सभेंत तरुणांस बॉंब गोळ्याचें रासायनिक शिक्षण देत. लंडनमध्यें इंडियन लोकांचे गुप्त हस्त-मुद्रक आहेत. त्यांतून हजारों स्वातंत्र्यध्येयगामि क्रांतिकारक वाङ्मयाचीं पत्रकें व पुस्तकें छापत आहेत व हिंदुस्थानभर गुप्तपणें वाटलीं जात आहेत. लंडनमध्यें असतांना विनायकरावांचा निरनिराळ्या देशांतील स्वातंत्र्याकरितां

प्रयत्न करणारांशीं दृढ परिचय होऊं लागला. रशिया, आयर्लंड, इजिप्त, तरुण तुर्क व चीन येथील परागंदा झालेले व न झालेले देशभक्त लंडनमध्यें आल्यावर विनायकरावांची भेट घेतच असत व त्यांचा परिचय होई. ग्यालिक अमेरिकन व अमेरिकन पोर्तुगाल इत्यादि देशांतील प्रमुख पत्रांतून विनायक या सहीनें जे लेख येत ते विनायकरावांचेच आहेत अशी त्यावेळीं दाट वदंता असे, दादाभाईंची " लंडन इंडियन " सोसायटी त्यांनीं अनेक कारस्थानें खेळून व आपले सभासद तीमध्यें घुसवून आपल्या ताब्यांत घेतली. हिंदुस्थानमध्यें विलायतेहून अनेक पत्रिका ( Pamphlet ) दर मेलला भराभर व माराभर निरनिराळ्या ठिकाणीं येऊं लागल्या त्या इतक्या कीं अखेर मुंबईसरकारास त्यावर नजर ठेवण्यास व त्याचा प्रसार बंद ठेवण्यास एक नवा विभागच काढावा लागला आणि तरीहि त्याचा प्रसार त्यावेळीं कितीं तरी होत होता असें त्यावेळचे अनेक गृहस्थ सांगतात. या सर्व पत्रिका सावरकरच लिहीत इत्यादि अनेक आरोप, आक्षेप, सावरकरांवर विलायती पोलिस व विलायती पत्रें उघडपणें करूं लागलीं.

* * * * *

सावरकरांची भेट घेऊन त्यांचें वर्णन प्रसिद्ध करणें हा विलायती पत्रांस एक चळच लागला. त्यांत कधीं कधीं गम्मत उडे असें सांगतात. त्यांतील एका महत्त्वाच्या पत्राचा बातमीदार एक दिवस सावरकरांची भेट घेण्यास आला. दारांतील इंग्लिश नोकरणीनें वेटिंग रूममध्यें त्यास बसविलें व त्यांनीं रीतीप्रमाणें नांवाचें कार्ड दिलें. तें तिनें जवळच सावरकर कांहीं आलेलीं पत्रें चाळीत होते त्यांस दिलें. तेव्हां तो बातमीदार नोकरणीस खुणेनें बोलावून म्हणाला, " मला सावरकरांना भेटावयाचें आहे ! ते कुठें आहेत ? " तिनें सांगितलें " तेच ते आहेत. आतांच आपल्याशीं बोलतील. " पण त्याचा कांहीं विश्वास पटेना. त्याला वाटलें कीं, त्याची थट्टा चालविली आहे ! इतक्यांत

सावरकर तीं पत्रें चाळीतच पुढें आले. नमस्कार चमत्कार करूं लागले. तेव्हां त्यांनीं त्यांस कळकळीनें विनंती केली कीं " खरोखरच कां सावरकर आपण आहांत ? " तेव्हां सावरकर म्हणाले " आयण निःशंक असा. त्या नावांचा मनुष्य तो मीच ! " आश्चर्यानें खांदा उडवून तो गृहस्थ म्हणाला " खरेंच कां ? आमची आपल्या• वयोमान व आकाराविषयीं कल्पना अगदीं उलट होती ! " सावरकर हंसले; " तर मग मी आपली निराशा केली यास्तव आपण मला क्षमा करावी. " तोहि हंसून म्हणाला, " तर मग आमचें पत्र आपणांसारख्या मिसूरहि पुरती न फुटलेल्या गृहस्थाचा इतके दिवस इतका प्रतिरोध करीत आहे हें आम्हांस ठाऊक नव्हतें ! " तेव्हां सावरकर तें सर्व हंसण्यावारी नेऊन म्हणाले कीं " पण आतां तें आपणांस ठाऊक झालें आहे तेव्हां आतां तरी आपण तसला विरोध करण्याचें सोडून दिलेंत म्हणजे झालें !" पण ह्या पत्राचा प्रतिरोध सावरकरांस मिसुर चांगली फुटली नाहीं हें कळल्यावरहि सुटला नाहीं ! बॅाटमलेच्या जॉन बुलनें तर अनेकवेळां सावरकरांस शिंगावर घेण्याचा यत्न केला. डेली न्यूज व मँचेस्टर गार्डियन या पत्रांनीं मात्र त्यांच्याविषयीं अंशतः विरोधी असले तरी फार गंभीर व मार्मिक लेख लिहित असावें.

* * * * *

अभिनव भारताचा असा हा धिंगाणा इंग्लंडमध्यें चालला असतांना सावरकर हिंदुस्थानांतील पत्रांतूनही तेजस्वी लेख धाडीतच होते. " काळ " व " विहारी " या पत्रांतील लंडनचीं बातमीपत्रें अजूनही कित्येकांस आठवत असतील ! इंग्लंडमध्यें गेल्यानंतर चार महिन्याचे आंतच त्यांनीं जोसेफ मॅझिनीचे आत्मवृत्ताचें मराठी भाषांतर प्रसिद्ध केलें. या पुस्तकानें महाराष्ट्रांत जी खळबळ उडवून दिली तिला अन्यत्र तोड क्वचित्‌च सांपडेल ! हजारों तरुणांच्या उड्या सावरकरांनीं लिहिलेल्या प्रस्तावनेवर पडूं लागल्या ! पालखींतून धर्मग्रंथाशेजारीं त्या पुस्तकास ठेवून मिरवणुकी काढण्यांत आल्या !

" सावरकरांचा मॅझिनी " ज्या त्या पत्रांतील अग्रलेखांचा विषय होऊन बसला. अखेर लोकप्रिय पुस्तकास मिळणारें शेवटचें व पहिलें पारितोषिक जें मिळावयाचें तेंहि सावरकरांच्या मॅझिनीला मिळालें. सरकारनें तें पुस्तक जप्त केलें ! आणि म्हणून कित्येक तरुणांनीं त्या पुस्तकाला जोडलेली प्रस्तावना वेदाप्रमाणें तोंडपाठ करून टाकली ! !

* * * * *

जोसेफ म्याझिनीचें भाषांतर संपतांच सावरकरांनीं १८५७ चें ' स्वातंत्र्ययुद्धा ' चा इतिहास लिहावयास घेतला. प्रतिदिवशीं ते जेवण होतांच सरकारी जुने कागदपत्र व ग्रंथ चाळीत. लंडनमधल्या ग्रंथालयांतून संध्याकाळपर्यंत बसत. अखेर हें पुस्तक लिहून पूर्ण होतें न होतें तोंच त्यावर सरकारी वक्रदृष्टि होऊन तें छापण्याचे आधींच सरकारजमा करण्यांत आलें ! ! कोणतेंही पुस्तक ज्याची हस्तलिखित प्रतही अजून पूर्ण झालेली नाहीं तें प्रसिद्धिपूर्वींच नव्हे तर छापण्यापूर्वी--नव्हे ! पुरतें लिहून होण्यापूर्वी जप्त केलें जाण्याचा हा मान सर्व जगतांत जवळ जवळ या एका पुस्तकालाच मिळाला असावा ! सावरकरांनीं लंडन टाइम्समध्यें अशी विनोदी टीका केली. तिला पुष्कळ इंग्लिश पत्रांनींही संमति देऊन सरकारचा निषेध केला. पण तें मराठी पुस्तक छापणें जरी अशक्य झालें तरी त्याचें इंग्रजी भाषांतर होऊन तें अप्रतिहत रीतीनें सर्वत्र प्रसृत करण्यांत आलें. एकदां तर त्यांच्या प्रतींवर इतकी मागणी आली कीं, एक प्रत दक्षिण अमेरिकेंत १५० रुपयांना विकली गेली ! त्या पुस्तकाची सर्व विक्री सावरकरांना सार्वजनिक कार्य करण्याकडे अर्पण केली. या पुस्तकाचेबद्दल सावरकरांचें व सर्व चित्पावनांचें परम सुहृद् Valantine chirole, Indian unrest मध्यें ह्मणतात " त्यांतील लेखन--सौंदर्य; अगाधविद्वत्ता व शोधकता हीं जितकीं आकर्षक आहेत, तितकाच त्यांतील हटवादीपणा व मतविपर्यास हीं ध्यानांत ठेवण्याजोगीं आहेत ! ! " त्यांच्या

रावांनीं जें अद्भुत संघटन चालविलें होतें त्याच्याशीं आहे हें म्हणणें फारसें धाडसाचें होणार नाहीं याची प्रचिती ज्यावेळीं एखादा साग्र इतिहास प्रसिद्ध होईल त्या वेळीं पटल्यावांचून रहाणार नाहीं. अशी आमची खात्री आहे. विनायकराव सावरकरांवर अखिल हिंदुस्थानांतील राजकीय कैद्यांपेक्षांही सरकारनीं जीं आज इतकीं वर्षें आकस धरली त्याचेंही कारण अंशतः यांतच सांपडेल. अजूनही चौदा वर्षांच्या दुःसह व सक्त मजुरीच्या बंदिवासानंतरही सरकार त्यांस समुद्राच्या, खंदकानें पारवृत असलेल्या रत्नागिरी जिल्ह्यांतच डांबून ठेवीत आहे. सरकारची ही अनुदार वृत्ति आतां तरी लवकरच नष्ट होवो.

* * * * *

त्यांच्या विलायतेमधील एकदोनच घटनांबद्दल कांहीं त्रोटक माहिती आम्हांस मिळाली आहे ती शितावरून भाताची परीक्षा करण्याकरतां आमच्या वाचकांपुढें मांडतों १९०९ चें वर्ष. ते बॅरिष्टरची परीक्षा आतांच उतरले होते. इतका राष्ट्रीय व्याप व ग्रंथलेखन चालवूनही ते परीक्षेंत कधींच अनुत्तीर्ण झाले नाहींत. आतां त्यास ब्यारिस्टरची सनद मिळावयाची व प्रिय मातृभूमीस परत फिरावयाचे दिवस जवळ आले. आतां चिरविरहित बंधूस भेटून सर्व वृत्तांत कळवीन व त्यांच्याकडून पाठ थोपटून घेईन ही मधुर आशा सुख देऊं लागली तोंच बातमी आली कीं, त्यांचे परमप्रिय ज्येष्ठबंधू गणेशपंत यांना अभिनवभारताचीं पुस्तकें व पदें छापण्याच्या अपराधासाठीं जन्मठेप काळपाण्याची शिक्षा झाली ! ही बातमी वाचून होते न होते तोंच दुसरी बातमी आली कीं कनिष्ठ बंधू बाळ केवळ १९ वर्षांचें पोर त्यासही लॉर्ड मिंटोवर पडलेल्या बांबचे प्रकरणांत अटक करण्यांत आली आहे. घरीं एकटी वहिनी उरली. तिचें केविलवाणें पत्र आलें कीं तात्या, मी एकटीच आहें. आपल्या वाटेकडे डोळे लागले आहेत. तात्यांनीं उत्तर दिलें:—

* * * * *

आतां आमची कसली वाट ! हिंदुस्थानांत आम्हांवरही वारंट आहे हें निश्चित समजलें आहे. पण वहिनी ! धीर धरा ! हें पहा !

“ महत्कार्याचें कंकण धरिलें
आतां महत्तमत्व पाहिजे बाणलें
ऐसें वर्तन पाहिजे केलें
कीं जें पसंत पडलें संतांनां !
पूर्वज अनंत ऋषीश्वर
अजात वंशजांचे संभार
साधु साधु गर्जतील
ऐसें वर्तणें या काला ! ! ”

* * * * *

इकडे इनच्या चालकांनीं ज्यांत लॉर्ड मोर्ले व इतर मोठमोठे अँग्लो-इंडियन प्रमुख होते—त्यांनीं सावरकरांवर खटला भरला. इनच्या सभासदां-पुढें त्यांनीं ब्यारिस्टरच्या धंद्याची अनुज्ञा द्यावी किंवा नाहीं याविषयीं विचार आरंभ झाला. हिंदुस्थानसरकाराकडून अनेक कागदपत्र सावरकरांच्या राजद्रोहीपणाचे पुरावे म्हणून धाडले गेले. सावरकरांनीं सर्व आक्षेपांचीं उत्तरें दिलीं. अंतीं असें ठरलें कीं, सावरकरांना सनद देण्यांत यावी. पण त्यांनीं राजद्रोह करणार नाहीं असें लिहून द्यावें. सावरकरांनीं सांगितलें कीं, मी राजद्रोह करीन तर सरकारचीं कोर्टें माझी चवकशी करून मला शिक्षा देतीलच मग हा करार कशाला पाहिजे ! दुसरें राजद्रोह म्हणजे काय हेंही गूढच आहे कारण वंदेमातरम् ओरडणें हेंही राजद्रोहच ठरतें ! !

* * * * *

अखेर निर्णय झाला कीं सावरकर अजून फार तरुण आहेत त्यांना त्यांची वर्तणूक सुधारण्यास कांहीं समय द्यावा. मग सनद देण्याचा प्रश्न पुन्हा विचारांत घ्यावा. दुसऱ्या शब्दांत म्हणावयाचें तर सावरकर आपली

राजकीय चळवळ सोडतील तर त्यांस सनद मिळावी. सावरकरांनीं सनदेच्या आशेनें राजकीय चळवळ सोडली नाहीं. हिंदुस्थानांत ब्यारिस्टरी सोडून देणारा पहिला वीर ब्यारिस्टर सावरकर होय.

*       *       *       *       *

यानंतरचीं राजकीय पटावरचीं स्थित्यंतरें विद्युद्वेगानें घडावयास लागलीं इतकें हिंदी क्रांतिकारक व सरकार यांच्यामध्यें धुमसत असलेला क्रोधाग्नी प्रज्वलित होऊन त्याच्या ज्वाला इकडे हिंदुस्थानांत व तिकडे लंडनमध्यें क्षणाक्षणाला व दिवसा दिवसाला भडकूं लागल्या. १९०९ चा जून अगर जुलई असेल त्यावेळीं सबंध इंग्लंड व हिंदुस्तान यांना विस्मयानें स्तिमित करणारा कर्झन वायली व लालकाका यांचा खून भर लंडन शहरांत झाला. मदनलाल धिंगडा या नांवाच्या हिंदी तरुणानें हा खून केला असें मागाहून सिद्ध झालें. नाना तर्क केले अखेर मदनलाल धिंगडानें जबानींत कथन केलें कीं ' हिंदुस्थानांतील तरुण देशभक्तांस ज्या अन्यायाच्या फांशीच्या वा हद्दपारीच्या शिक्षा झाल्या त्याचा मी सूड उगवण्याकरतां हें कृत्य केलें. '

*       *       *       *       *

डिंगराच्या या कृत्यानें सर्व इंग्लंडमध्यें एकदम खळबळ उडून गेली. इंग्लंडमध्यें असलेल्या हिंदी लोकांनीं निषेध करण्याकरितां सभा, लेख, व्याख्यानें यांची झोड उडवून दिली. भावनगरी, सुरेंद्रनाथ बानर्जी, पालबाबू, खापर्डे इत्यादि अनेक पुढाऱ्यांनीं डिंगराची चौकशी आरंभलीहि नव्हती तोंच त्या कृत्याचा निषेध करण्याकरितां सभा भरविली. अनेक ॲंग्लो इंडियन सभेस होते. अनेक इंग्लिश लोकही आले होते. डिंगराच्या प्रत्यक्ष बापानें विलायतेस तार दिली कीं, " असला कारटा माझ्या पोटीं आला ही केवढी लज्जास्पद गोष्ट ! मला वाटतें तो माझा मुलगाच नव्हे ! !" सभेंत डिंगऱ्याच्या दुष्कृत्याची, खुनाची, माथेफिरूपणाची यथास्थित निंदा झाल्यावर असल्या खुनी व भ्याड नीचाच्या नीच कृत्याचा आम्ही तीव्र

निषेध करतों असा ठराव पुढें आला व सभेंतील लोकांत कोणी त्यांना अमेंडमेंट—पुस्ती जोडणार आहेत हें माहीत असतांही दाबून तो " सर्वानुमतें संमत झाला म्हणून अध्यक्ष व मुख्य चालक आगाखान व भावनगरी मोठमोठ्यानें ओरडूं लागले !

* * * * *

मँचेस्टर गार्डियन म्हणतें, इतक्यांत " No ! No ! not unanimously ! " म्हणून एक ध्वनि सभेमधून उठला. कोण ? कोण विरुद्ध आहे ! म्हणून सर्व हिंदी पुढारी व अँग्लोइंडियन चवताळून ओरडूं लागले ! " मी " म्हणून कोणी म्हणालें. त्याचें नांव काय ? हुसका त्याला ! बसवा त्याला ! पोलीस ! भावनगरी तर ओरडत उठले " लाथ मारून हांकून द्या त्याला ! ! कुठें आहे तो ! " " हा मी येथें आहें व माझें नांव सावरकर आहे; माझें मत ह्या ठरावाच्या विरुद्ध आहे ! " अत्यंत शांतपणें पण उंच स्वरात उत्तर आलें. सर्व वळून पहातात तों एक सडसडित बांध्याचा तरुण सभेंत उभा आहे. " Youth and intelligence were stamped upon his face " तारुण्य व बुद्धिमत्ता त्याच्या चेहऱ्यावर तळपत होती. " मारा हाणा " असा एकच गोंगाट उठला, कारण सर्वांस सावरकरांस पाहतांच भीति पडली कीं, बहुतेक हा क्रांतिकारकांस घेऊन इथें बॉबबिंब फेंकण्यास तर आला नाहीं ! इतक्यांत एक दांडगा युरेजियन म्हणजे निमगोरा साहेब भावनगरीच्या चिथावण्यानें सरसरत पुढें घुसला व त्यानें सावरकरांच्या डोळ्यावर बळकट ठोसा मारला. चष्मा फुटला. रक्त भळभळ वाहूं लागलें. तोंड व कपडे त्यांत भिजून लाल झाले. तरीहि क्षणमात्र चंचल न होतां व प्रतिकार न करतां सावरकर अधिकच शांतपणें व दृढतर स्वरानें म्हणाले, " तरीहि माझें मत या ठरावाचे विरुद्धच आहे ! "

* * * * *

सावरकरांस रक्तबंबाळ पाहतांच तें न साहून एका हिंदी तरुणानें त्या युरेजियनाचे डोक्यांत हातांतील लाठी घातली. त्याचें डोकें फुटलें. रक्त भळभळ वाहूं लागलें; तोंड व कपडे त्यांत भिजून चिंब झाले. तो धडपड करीत खुर्चीवर पडला.

* * * * *

झालें. सभेंत एकच हांकाहांक झाली. कांहींतरी संकट कोसळलें आहे अशा भयानें कुणी खुर्चीवर तर कुणी बांकाखालीं दडले. इंग्लिशास वाटलें कीं, डिंगराप्रमाणेंच एथेंही खून पडणार! सभेंतून निघून निसटून जाण्या-साठीं एकाएकीं इतकी धांदल उडाली कीं, दारांत इंग्लिश मडमा चेंगरून ओरडूं लागल्या. पोलिस आले. व त्यांनीं भावनगरीचे सांगण्यावरून साव-रकरांस अटक केली! सुरेंद्रनाथ बानर्जी "सावरकरांस मारणें अत्याचार होय" असें म्हणून उठून गेले! सभा उधळली! ठराव केराचे टोपलींत पडला! क्रांतिकारकांचा बेत सिद्धिस गेला!!

* * * * *

कांहीं तासांनीं सावरकरांस कांहींच आरोप न ठेवतां आल्यानें सोडून दिलें. व उलट विचारलें कीं, तुमची फिर्याद असल्यास त्या युरेजियनास पकडतों. सावरकरांनीं तें नाहीं म्हटलें. सुटतांच सावरकरांनीं "टाइम्स" मध्यें आपल्या वर्तनाचें स्पष्टीकरण धाडलें तेंच दुसरे दिवशींच्या लंडनमधील पत्रांतील विषय होऊन बसला होता. सावरकरांनीं लिहिलें होतें कीं, ज्या मनुष्याची चौकशी न्यायासनापुढें अजून व्हावयाची आहे व ज्यानें तें कृत्य कां केलें त्या विषयीं मोठमोठे अधिकारी वेडेपणाच्या भरांत वा घरगुती द्वेषानें केलें असें ते म्हणत आहेत त्याचें तें कृत्य राजकीयच आहे असें गृहीत धरून त्याचेवर तो दोष सिद्ध आहे हें समजण्यांत न्यायालयाचा व समंजस-पणाचाही उपमर्द होत आहे. तें कृत्य राजकीय नव्हे असें ठरलें तर? म्हणून निषेधाची अशी घिसाडघाई करूं नये. आजपर्यंत कित्येक इंग्लिश सोजि-

सावरकरांस रक्तबंबाळ पाहतांच तें न साहून एका हिंदी तरुणानें त्या युरेजियनाचे डोक्यांत हातांतील लाठी घातली. त्याचें डोकें फुटलें. रक्त भळभळ वाहूं लागलें; तोंड व कपडे त्यांत भिजून चिंब झाले. तो धडपड करीत खुर्चीवर पडला.

* * * * *

झालें. सभेंत एकच हांकाहांक झाली. कांहींतरी संकट कोसळलें आहे अशा भयानें कुणी खुर्चीवर तर कुणी बांकाखालीं दडले. इंग्लिशास वाटलें कीं, डिंगराप्रमाणेंच एथेंही खून पडणार! सभेंतून निघून निसटून जाण्यासाठीं एकाएकीं इतकी धांदल उडाली कीं, दारांत इंग्लिश मडमा चेंगरून ओरडूं लागल्या. पोलिस आले. व त्यांनीं भावनगरीचे सांगण्यावरून सावरकरांस अटक केली! सुरेंद्रनाथ बानर्जी "सावरकरांस मारणें अत्याचार होय" असें म्हणून उठून गेले! सभा उधळली! ठराव केराचे टोपलींत पडला! क्रांतिकारकांचा बेत सिद्धिस गेला!!

* * * * *

कांहीं तासांनीं सावरकरांस कांहींच आरोप न ठेवतां आल्यानें सोडून दिलें. व उलट विचारलें कीं, तुमची फिर्याद असल्यास त्या युरेजियनास पकडतों. सावरकरांनीं तें नाहीं म्हटलें. सुटतांच सावरकरांनीं "टाइम्स" मध्यें आपल्या वर्तनाचें स्पष्टीकरण धाडलें तेंच दुसरे दिवशींच्या लंडनमधील पत्रांतील विषय होऊन बसला होता. सावरकरांनीं लिहिलें होतें कीं, ज्या मनुष्याची चौकशी न्यायासनापुढें अजून व्हावयाची आहे व ज्यानें तें कृत्य कां केलें त्या विषयीं मोठमोठे अधिकारी वेडेपणाच्या भरांत वा घरगुती द्वेषानें केलें असें ते म्हणत आहेत त्याचें तें कृत्य राजकीयच आहे असें गृहीत धरून त्याचेवर तो दोष सिद्ध आहे हें समजण्यांत न्यायालयाचा व समंजसपणाचाही उपमर्द होत आहे. तें कृत्य राजकीय नव्हे असें ठरलें तर? म्हणून निषेधाची अशी घिसाडघाई करूं नये. आजपर्यंत कित्येक इंग्लिश सोजि-

रांनीं हिंदी माणसांस मारलें आहे. पण त्यावेळेस कोणी इंग्लिश लोक न्यायालयाचा निर्णय होण्यापूर्वी अशा सभा करतात कीं काय? कचित् तशा सोजिरांप्रमाणेंच दारूचे गुंगींत हें कृत्यही झालें असेल! काय तें न्यायाल्यांत ठरे तोंपर्यंत स्वतः इंग्लिश लोकांनीं डिंगराच्या निषेधाची एकहि सभा भरविली नसतां त्याच्याच देशबांधवांनीं स्वतःच न्यायालय बनण्याइतका घाबरेपणा प्रदर्शवूं नये अशी आपण ठरावास उपसूचना आणणार होतों. तोंच एक मतानें ठराव ग्राह्य म्हटलें असतें म्हणजे झालें असतें! पण तें कांहीं एक न करतां काल्पनिक बॉंब गोळ्यांचीं चित्रें पाहून सगळे जणांनीं एकदम पळापळीस आरंभ केला व अन्यायानें मजवर आघात केला!" हें पत्र टाइम्समध्यें येतांच शिवराळ पत्रें धूप बसलीं व कोणी कोणी सावरकरांचें समर्थनही केलें. सुरेंद्रनाथ बानर्जी यानंतर जेव्हां विलायेहून परत मुंबईस आले त्यावेळीं राष्ट्रमताच्या प्रतिनिधीनें त्यांची भेट घेतली तेव्हां त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, सावरकरांचें म्हणणें अगदीं न्याय्य होतें व त्यांच्यावर केलेला आघात हा अत्याचार होता!

* * * * *

पण ज्याचे डोक्यांत घाव लागलेला होता त्या निमगोऱ्या साहेबास चैन पडेना. त्यानें पूर्ण गोऱ्या साहेबांत मिसळण्याची ही अपूर्व संधि आहे असें समजून टाइम्समध्यें प्रसिद्ध केलें कीं, मीच तो गृहस्थ कीं ज्यानें सावरकरांस " a genvine Britise blow!" एक अस्सल ब्रिटिश ठोसा दिला! त्याच्या या बदमाष प्रौढीस दुसऱ्याच दिवशीं टाइम्समध्यें "ब्रिटिश ठोश्याचें डोकें दुभंग करणारी " a Straight Indian Lathi एक सरळ इंडियन लाठी!" या सहीनें एक चरचरीत उत्तर दिलें गेलें!

* * * * *

पण आतां मात्र लंडनचे पोलीस हिंदी तरुणांचे मागें छायेसारखे लागले. सावरकरांच्या नेतृत्वाखालीं हिंदी तरुणांनींही स्काटलंड–यार्ड ह्या लंडनच्या

पोलिसच्या मुख्य ठाण्याला पुरे पुरे केलें. त्या गमती सांगूं लागलें तर एक ग्रंथ होईल. इतक्यापर्यंत तोंडीस तोंड उठत गेली कीं, कधीं कधीं पोलिसांनीं हिंदी संस्थेंत डिटेक्टिव्ह घुसवावेत तर कधीं हिंदी तरुणांनीं पोलिसच्या ऑफिसांत आपले डिटेक्टिव्ह ठेवावेत. कांहीं विश्वासूक हिंदी तरुण पोलिसांमध्यें डिटेक्टिव्ह म्हणून नौकर राहून त्यांचाच पगार खाऊन उलट त्यांची खित्तं बातमी सावरकरांस पोंचवीत व उलट सावरकर सांगतील तितकीच बातमी व कधीं कधीं तर पोलिसांस भलत्याच मार्गांत फसविणारी बातमी ते नेऊन पोलिसांस देत. उत्तर हिंदुस्तानांत प्रसिद्ध असलेले असे एक कार्यकर्ते आहेत कीं, ज्यांच्याबद्दल ते पोलिसांमध्यें आहेत अशी वदंता मोठमोठ्या लोकांत पसरली होती. त्यांना स्वतः विचारतां त्यांनीं स्पष्ट असेंही सांगितल्याचें नागपूर कॉंग्रेसमध्यें आमचे ऐकण्यांत आलें कीं, होय; मी लंडनमध्यें पोलिसखात्यांत नौकर होतों. परंतु तो लोकपक्षाच्या बातम्या देण्याकरतां नव्हे तर गुप्त पोलिसांच्या बातम्या लोकपक्षाला देण्याकरतां होतों. व खुद्द सावरकरांच्या संमतीनें मला ही कामगिरी (Duty) सांगितली गेली होती. त्या वेळीं लंडनमध्यें असलेले गृहस्थ असेंही सांगत होते कीं, असाच एक गृहस्थ लंडन गुप्त पोलिसांत असतांना तो उमगला गेला व त्यास पकडण्यास वारंटही सुटलें होतें, तोंच त्यांस ही बातमी कळून तो रात्रीचे रात्रीं पॅरिसला निसटून गेला. हे एक मद्रासी गृहस्थ होते व हल्लीं ते तिकडेच आहेत असें म्हणतात.

* * * * *

त्या हिंदी तरुणास रहावयास जागा नाहीं, शिकावयास शाळा नाहीं, बोलावयास कोणी धजत नाहीं, घरचे कोणी संबंध ठेवीत नाहींत व अहर्निश देशासाठीं झटत, झगडत असतां, लोकांस त्याचें नांव माहीत होऊन मिळणाऱ्या कीर्तीचेंही, गुप्तपणें काम करावें लागल्यानें लवलेश समाधान नाहीं. पण अशा स्थितींतही त्यांनीं त्याचें व्रत अखंड व अधिकच नेटानें चालविलें.

अतिरात्रीं निजावयास जावयापूर्वी दिवसा केलेल्या खटपटींचा आढावा काढून व उद्यां करावयाच्या खटपटी व कामें वाटून घेऊन ते उभे राहात व गंभीरपणें आपल्या राजकीय प्रतिज्ञांची Their political catechism ची त्यांच्या राष्ट्रव्रताच्या ब्रीदांची घोषणा करीत सर्वजण एक स्वरानें उच्चारीत!" हिंदुस्थान स्वतंत्र झालेंच पाहिजे! हिंदुस्थान एकराष्ट्र झालेंच पाहिजे! हिंदुस्थान लोकसत्ताक झालेंच पाहिजे! हिंदुस्थान एकभाषी झालेंच पाहिजे! हिंदुस्थान एकलिपिक झालेंच पाहिजे! ती लिपी नागरी होय. ती भाषा हिंदी होय. ती लोकसत्ता म्हणजे राजा वा अध्यक्ष यापैकीं कोण वरणीय हा प्रश्न नसून राजा असो वा अध्यक्ष असो तो लोकांनीं निर्वाचित केलेला व तो निर्वाचित आहे तोपर्यंतच अस्तित्वांत राहाणारा ज्या राष्ट्र संस्थेंत असतो ती राष्ट्रसंस्था होय!"

* * * * *

सांगणेंच नलगे कीं, जर सर्वसाधारण देशसेवकांच्या मागें इतके पोलीस लागलेले होते तर त्यांनीं सावरकरांच्या मागें जाचाची परमावधीच केलेली असेल! सावरकरांस घरच्या प्रियजनांचीं पत्रें मिळण्याचीही चोरी झाली! दरमेलनें कोणी तरी प्रवासी त्यांच्या कुटुंबावर गुदरलेला कोणचातरी नवा अनर्थ येऊन सांगे. त्यांच्या दूरदूरच्या आप्तांसही छळण्याचा सपाटा चालला. कोणाच्या नोकऱ्या गेल्या! कोणाचे धंदे बुडाले! कोणाच्या मत्ता व सर्व धन जप्त झालें. त्यापैकीं कोणी शिव्यांची लाखोलीही वाहूं लागले व या कुळकलंकानें आह्मांस नागवलें म्हणून म्हणूं लागले! कोणाशीं बोलूं जावें तर तो तोंड फिरवी, कोठें उतरावयास जावें तर डिटेक्टिव्ह डोळे वटारतांच त्या घरवाल्यानें अथवा खाणावळवाल्यानें त्यांस दार बंद करावें, एकदां तर असेंच बिऱ्हाड-पैसे देऊन! पहातां पहातां थकून अखेर एका हाटेलांत स्थळ मिळालें. सामान आणून खालच्या खोलींत ठेवून हुश्श करून ते बसले. त्यांचा एक प्रिय मित्र होता तोही त्या दिवशीं येऊं शकला नाहीं. धाकट्या

भावास मिंटोचे प्रकरणांत अटक झाली होती तिचें पुढें काय झालें तें कांहींच कळेना. कारण पत्रें सगळीं पोस्टांत गडप होत! वर्तमानपत्रांत तरी बघावें म्हणून हिंदुस्थानी एक दोन वर्तमानपत्रें उघडलीं. इतक्यांत हाटेलाचा धनी आला व ह्मणाला, "Sir I am sorry I cannot keep you here, you must quit this room! The police are after me I shall loose my job!" (महाराज! मी आपल्याला राहूं देण्याला असमर्थ आहे. याबद्दल मला वाईट वाटतें. तुम्ही ही खोली आतां सोडली पाहिजे. पोलिस मला त्रास देत आहे. माझा धंदा बुडेल!) तेव्हां निरुपाय झाला. अर्ध्यारात्रीं विसावा न घेतां तसेंच बाहेर पडावें लागलें! बिऱ्हाड मिळेना! अक्षरशः भर लंडन शहरांत डोकें टेकावयास स्थळ मिळेना!! पैसे देऊन स्थळ मिळेना!!? बरें लंडन सोडावें तर जावें कोठें? हिंदुस्थानांत? ती चिरप्रिय व चिरआकांक्षित आशा भग्न झालेली! खावें काय? ब्यारिस्टरी करून? जी वर्तणूक सुधारल्यानें ब्यारिस्टरी त्याच क्षणीं मिळूं शकती ती वर्तणुक सुधारणें तर या जन्मांत शक्य नाहीं. देशसेवेचा तो छंद, तें व्यसन सुटणें या जन्मांत तर शक्य नाहीं! प्रकृती तर दिवसें दिवस खंगत चालली!!

* * * * *

अशाच एका समयीं ब्रायटनला ते विश्रांतीसाठीं गेले असतां समुद्रकांठीं एकाकीं बसले असतांना तो सूर्यास्त पाहून त्यांना हिंदुस्थानच्या सिंधुतटावरील सूर्यास्ताची आठवण झाली व सहज छंद धरतां धरतां रचलेलें पद शेवटीं दिलें आहे.

# प्रकरण ६ वें.

## पॅरिस व इंग्लंडमधील धरपकड.

पुढें लगेच "तरवार" नांवाचें पत्रही त्यांनीं काढलें. हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे कीं, त्यापत्रांत त्यांनीं आरंभींच हें सांगितलें होतें कीं "जेथें सत्यमत प्रतिपादनास प्रतिबंध असेल तेथेंच गुप्तसंस्था अपरिहार्य व म्हणून न्याय्य होत. जेथें राष्ट्रसंस्थेच्या विकासाला व नैसर्गिक उत्क्रांतीला बलात्कार वाव ठेवीत नसेल तेथेंच क्रांतीचा आघात न्याय्य आहे. राज्यघटनेच्या सौम्य मार्गानें लोकांस आपलें मत जेथें स्थापित करतां येतें अशा इंग्लंड फ्रान्स इत्यादि देशांतून शांतीचे वैध प्रयत्न सोडून क्रांतिकारक गुप्त चळवळी कोण करील तर मात्र तो आततायीपणा होईल. असा शांतीचा, राज्यघटनेचा ( Constitutional ) वैधमार्ग आमच्या देशांत शक्य होतांच आम्ही गुप्त व सशस्त्र प्रतिरोध मोठ्या आनंदानें सोडून देऊं. हिंदुस्थानास स्वातंत्र्य मिळविणें आहे–फार इच्छा आहे कीं, शांतीनें व शांतिनेंच तें मिळवावें. परंतु तुमचा बलात्कार तें अशक्य करतो म्हणून आम्हीही बलानेंच तो बलात्कार हाणूं पहातों." सावरकरांनीं हें तरवार पत्र आपले नवागत मित्र वीरेन्द्रनाथ चट्टोपाध्याय यांचेकडे सोपविलें होतें. १९१८ सालीं विनायकरावांनीं सुधारणांबद्दल जें मत दिलें होतें तेंहि याच अर्थाचें होतें कीं 'It is a mockery to talk of constitutional agitation where there is no constitution at all. But it a greater mockery-even a crime-to talk of revolulion when there is a constitution, that allows the fullest development of a nation.'

*       *       *       *       *



सावरकरांना ब्रांकाइटसची व्यथा होऊन ते आरोग्यभवनांत वेल्समध्यें जाऊन राहिले होते. संध्याकाळचीं पत्रें येऊन गेलीं. पण डॉक्टरनें सावरकरांस पत्रें वाचणें मना केलें होतें. इतक्यांत एक एका इंग्लिश पत्राचे संपादक त्याच भवनांत आजारी होते. ते सावकरांकडे येऊन त्यांनीं त्यास एक तार दाखविली. तिचा आशय असा होता "गणेश दामोदर सावरकर यांचे अपिलांत त्यांची जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा स्थिर झाली. त्याचप्रमाणें अनंता कान्हेरे यांनीं नाशिकच्या कलेक्टराला गोळी घालून मारलें !

* * * * *

दुसरे दिवशींपासून इंग्रजी पत्रें सावरकरांचें उघड नांव घेऊन या सर्व असंतोषाचें व अत्याचाराचें तेच मूळ आहेत म्हणून म्हणूं लागलीं ! एकच गवगवा झाला. सावरकरांच्या सर्व सहकाऱ्यांनीं सावरकरांनीं फ्रान्सला निघून जावें म्हणून विनंति केली. सावरकरांनीं आपण कार्य सोडून जाऊं इच्छित नाहीं असें सांगितलें. परंतु हिंदी तरुणांनीं आग्रह धरला कीं, " आपली प्रकृति व आपलें स्वतंत्र मुक्त रहाणें हें आम्हांस, कार्यांतलें कार्य वाटत असल्यानें आमचा आग्रह कीं आपण फ्रान्सला आलेल्या मनुष्याबरोबरच निघून जावें." प्यारिसहूनही तशाच तारा व पत्रें आलीं. तेव्हां आजारीपणांतच सावरकरांना इंग्लंडमधील सहकाऱ्यांस व स्नेह्यांस मागें सोडून जातांना हिंदुस्थान सोडलें तेव्हां जितकें विरही व उदास वाटलें तितकेंच त्यांस आतांही वाटलें !

* * * * *

प्यारिसला येतांच आपल्या या तरुण अध्यक्षाचें सर्वांनीं मनापासून स्वागत केलें, आतां लंडन सुटून प्यारीस त्यांच्या राष्ट्रीय यत्नांचें केंद्रस्थान होऊं लागलें. तेथें ते म्याडम कामा यांच्या घरीं राहूं लागले. ह्या बाईनीं त्यांचेवर मुलापेक्षांही जास्त प्रेम करून त्यांची व्यवस्था ठेवल्यानें ते लवकरच बरे झाले. या बाई " वंदेमातरम् " नांवाचें इंग्लिश वर्तमानपत्र चालवीत असत. व अमेरिका, जर्मनी व इतर देशीं हिंदुस्थानाच्या आकांक्षांची व चळवळींची

माहिती व व्याख्यानें देऊन मिशनऱ्यांनीं रेखलेलीं हिंदी लोकांचीं भेसुर चित्रें कल्पनेच्या भिंतीवरून हिसडून काढून टाकीत. त्यांनीं प्रथम दादाभाईंच्या निवडणुकीच्या प्रसंगीं त्यांचे हाताखालीं काम केलेलें होतें. पुढें त्या होमरूल सोसायटींत आल्या व निःशस्त्र प्रतिकाराच्या धर्मास धरून राहिल्या. परंतु नंतर त्यांस तें सर्व फोल वाटून त्या अभिनवभारतांत शिरून त्यांतील एक प्रमुख सभासद होऊन बसल्या.

* * * * *

एकदां म्याडम कामाबाई जर्मनीमध्यें गेलेल्या होत्या तेथें जर्मन लोकांचें अखिल सोशियालिस्ट युनियन भरलें होतें. त्या विस्तीर्ण सभेंत कामाबाई साठीं एक हिंदी ललनाग्रणी म्हणून कौतुकानें आमंत्रण दिलेलें होतें. तेथें जाण्याचें आधीं कामाबाईंनीं एक तिरंगी सुंदर ध्वज अभिनवभारतासाठीं सज्ज केलेला होता तो बरोबर घेतला. जेव्हां सभेंत त्यांस बोलावयास आग्रह झाला तेव्हां हिंदुस्थानांतील राज्यक्रांती या विषयावर त्यांनीं व्याख्यान देण्यास आरंभ केला. थोड्याच वेळांत हिंदी महिलेचा तो रेशमी व बहुमोल साडीचा वेष, तें तेज, तो आवेश पाहून सभा आश्चर्यचकित झाली. जो तो म्हणूं लागला, " She is an Indian princess. " ती एक हिंदुस्थानांतील राजकुमारी आहे, इतक्यांत तो ध्वज एकाएकीं उचलून व फडकावून कामाबाई स्फूर्तिदायक आवेशानें म्हणाल्या, " This is the flag of Indian Independence. Behold it is boon ! It is already sanctified by the blood of the martyred Indian youths ! I call upon you, gentlemen ! to rise and salute this flag of new India of Indian Independence. " " हा बघा हिंदवी स्वातंत्र्याचा ध्वज. पहा, हा उदय पावला ! हिंदी तरुण हुतात्म्यांच्या रक्तानें हा आधींच पावन झालेला आहे ! नागरिक हो ! उठा, आणि या अभिनव भारताच्या—या हिंदवी स्वातंत्र्याच्या—

ध्वजाचीं वंदना करा! कामाबाईचीं हीं वाक्यें एखाद्या घणाच्या आघातासारखीं त्या सभेच्या वातावरणांत दणदणत शिरलीं! हातानें तो ध्वज आवेशानें फडकावीतच त्या जेव्हां हे आव्हान देत्या झाल्या तेव्हां ती सभा एकदम चित्रासारखी उभी राहिली व स्वतंत्र हिंदुस्थानच्या जगामध्यें प्रथमच उभारलेल्या त्या ध्वजास वंदना ( Salute ) देती झाली!

* * * * *

प्यारीसला आतां हिंदुस्थानांतील कान्हेऱ्यांच्या कटाचा कोर्टांतील वृत्तांत येऊं लागला. कोर्टांत गोन्हे, देशपांडे, खरे इत्यादिकांनीं जें सांगितलें कीं, आमच्याकडून वृत्त काढून घेण्यासाठीं पोलिसांनीं छळ केला, तीही बातमी आली. पोलिस म्हणाले कीं, हें सर्व खोटें, छळबीळ कांहीं झाला नाहीं तीहि बातमी आली. खरें कांहींच कळेना. इकडे लंडनमध्येंही मागें उरलेल्या हिंदी तरुणांस वारंटें सुटणार अशी भूमका उठल्यानें त्यांनींही लंडन सोडून जावें अशीं बोलणीं आरंभिलीं गेली. पण सगळ्यांनीं लंडन सोडलें तर तेथें काम तरी कोण करणार? बरें आपण त्यांस लंडन सोडूं नका ह्मणावें तर त्याचा विपर्यासही कोणी करूं शकेल. इंग्लिश पत्रें तर ह्मणणारच. व ह्मणतच होतीं कीं, स्वतः आगी बाहेर राहून इतर अपक्क तरुणांस सावरकर आगींत ढकलीत आहेत. तरी बरें ह्या तरुणांपैकीं बहुतेक सर्व लोक ढिंगरासुद्धां—सावरकरांपेक्षां दोन पावसाळ्यांनीं वडीलच होते. तेव्हां जें होईल तें होईल. आपण प्यारिसला न राहतां इंग्लंडमध्येंच जावें. ह्मणजे धरले गेलों तर निदान कार्य मरेतों केल्याचें समाधान लाधेल व एका महान् स्वार्थत्यागाचें शिक्षण व धडा राष्ट्रापुढें आपल्या मरणानें ठेवला गेल्यानें इतरांसही तसेंच झुंजत राहण्याची स्फूर्ती येईल. बरें न धरलों गेलों तर लंडनमध्यें प्यारिसपेक्षां अनेकपटीनें जें राष्ट्रकार्य करतां येण्यासारखें आहे तें करतां येईल व इतरांस लंडन सोडून जाऊं नका असें सांगण्यास आपणांस अधिकार प्राप्त होईल. शत्रूंचे कुतर्कही खुंटून जातील. सावरकरांस वारंवार

असें वाटे, पण प्यारिसचे मित्र तो बेत खुडून काढीत. अशा द्विधा स्थितात कांहीं दिवस गेले.

* * * * *

सावरकरांना प्यारिसहून लंडनमध्यें परत येण्यास काय काय बनाव कारणें झालीं याची रहस्यमय हकीगत अजूनही पूर्वीप्रमाणेंच गूढाच्या छायेनें आवृत आहे. ती ज्यावेळीं खुद्द सावरकरच सांगतील त्याच वेळीं आपणांस कळेल. तोंपर्यंत हें एक इतिहासाला गूढच म्हणून राहणार. तरीही इतकें मात्र खरें कीं, पुढें वर्णन केलेली गोष्ट, जीं अनेक कारणें घडलीं त्यांतील एक कारण होती असें त्यांच्या एका निकटवर्ति स्नेह्यानें सांगितलें आहे. ती हकीगत अशी:—प्यारिसमध्यें एक सुंदर क्रीडानदी केलेली आहे. त्या बाजूस एक दिवस सावरकर व त्यांचे सहकारी मित्र हरदयाल फिरावयास गेले. हरदयाल हे प्रथम सिव्हिल सर्व्हिसची परिक्षा देण्यास सरकारी शिष्य-वृत्तीनें इंग्लंडला आले होते. पण तेथें त्यांचा मतविकास होत होता. ते अभिनवभारताचे गोटांतील एक प्रमुख कार्यकारी झालेले होते. त्या सुंदर क्रीडा नदीवर अनेक ओळखीचे हंसजातीय पक्षी क्रीडा करीत होते. नाना फुलें फुललेलीं होतीं. कृत्रिम धबधबे मंजुळ पतन घेत घेत नदींत उतरत होते. तो शुद्ध सुगंधित वायु खोल श्वासोश्वास करीत वैद्यांनीं सांगितल्या-प्रमाणें ते उभयतां नदीकांठानें क्षणभर हिंडले. तों एक मराठी वर्तमान-पत्र खिशांतच राहिलेलें होतें तें वाचावयास सावरकरांनीं हातांत घेतलें. परमप्रिय स्नेह्यांवर, जीव कीं प्राण असलेल्या धाकट्या भावावर, सहकारी संवगड्यांवर, लाडक्या शिष्यांवर, पूज्य देशभक्तांवर देशांत हे प्रसंग, हे छळ, हे बंदिवास गुजरत असतां मी येथें क्रीडानदीवर पक्ष्यांची व फुलांची सुंदरता पहात रमतों आहें ना ? माझ्या उपदेशानें प्रेरित होऊन, माझ्या शब्दांबरोबर आपला प्राण देणारे हे माझे आप्त इष्ट व देशबांधव तिकडे जाच, छळ सोशीत असतांना व तुरुंगांतील अंधाऱ्यांतून अन्नाशिवाय

कुजत पडले असतांना मी प्यारिसमधील शुद्ध सुगंधित वायु सेवन करून खोलखोल श्वासोश्वास करीत हिंडावें ना! हाय! हाय! त्यांस हें कळेल तर ते मला नीच म्हणून म्हणणार नाहींत काय! त्यांनीं म्हटलें तर त्यांचा काय दोष!

हे व असलेच विचार सावरकरांच्या डोक्यांत काहूर करून उठले व त्यासरशीं हा अभिजात कुलांत उत्पन्न झालेला, उच्च ध्येयाकडे भरारी मारणारा, स्वतःच्या प्राणांस लीलेनें मातृभूमीकरितां हवन करण्यास सिद्ध झालेला हा उदार, भावनाप्रधान तरुण निश्चय करून उठला कीं, " मी परत लंडनला जाणार! मी माझे भाऊ, स्नेही, सहकारी अशा अनेक देशवीरांबरोबर पहिल्या सरबत्तींतच देशाच्या कामास येणार! मी पॅरिसला रहाणार नाहीं. सगळेच मागें राहिले तर मरणार तरी कोण! जो तो विजय पहावयास इच्छूं लागला तर लढाईचे तोंडावर उभा राहून विपक्षाची पहिली फैर छातीवर झेलणार तरी कोण! छे, मी जाणार!!

* * * * ७

पंडित शामजींचा सावरकरांवर अतिशय लोभ असे. ते वारंवार म्हणाले छे! छे! आपण जाऊं नये! "Thou art a general! Thou must not go to the trenches." आपण सेनापति आहां! आपण लढाईच्या तोंडावर जातांकामा नये, सेनापती का कधीं सायपर्स व मायनर्समध्यें जातो!" सावरकर हें ऐकून अधिकच लाजत. त्यांस वाटे कीं, जे तोंडावर फौजेंत धरले गेले त्यांस शिपाई म्हणावें व आपण जे मागें मागें कातडें बचावून रहातों त्यांनीं जनरल म्हणवावें हें कसेंसेंच दिसतें. मी तोंडावर जातों. धक्काधक्कींत गोळागोळींत सुटून पुन्हां जिवंत आलों तर जनरल म्हणवीन व मागें राहीन! सगळ्यांनीं मोडा घातला पण ह्यांनीं जातोंच म्हटलें. आणखी कांहीं कारणें त्यांच्या पॅरिसहून लंडनला जाण्यास झालीं होतीं पण तें सविस्तर वृत्त जेव्हां ते स्वतःच प्रसिद्ध करतील तेव्हां कळेल. तेथें अति संक्षेपतः अगदीं प्रसिद्ध असलेल्या व कांहीं त्यांच्या

विश्वासू मित्रांच्या तोंडून ऐकलेल्या शब्दांचींच काय तीं अवतरणें देणें शक्य आहे.

* * * * *

हें साल १९१० चें होतें. शेवटीं सावरकर लंडनला जाणाऱ्या बोटींत चढले. स्टेशनवर प्यारीसमधले सर्व हिंदी लोक, व्यापारी व विद्यार्थी पोंचविण्यास आलेले होते. त्या सर्वांचें सावरकरांवर विलक्षण प्रेम व विश्वास होता. त्या सर्वांस त्यांनीं पुनः पुन्हां सांगितलें कीं, आतां येतों!" "Upto this time yon have seen how I tried my best to work much. Now let me see if I can also suffer much!" "आजपर्यंत शक्य तितकें काम करण्याचा प्रयत्न मी करीत आलों आतां शक्य तितकें पुष्कळ सहन करण्याची अनुज्ञा असावी!" गाडी चालू झाली. बोटही चालू झाली. इंग्लंडला लागली. सावरकर उतरले व गाडींत बसले. डब्यांतच पोलिसांचा गुप्तपणें कडेकोट सशस्त्र पहारा होता. लंडनच्या स्टेशनांत ट्रेन घुसली. सावरकरांचा डबा येतांच "इथेंच! इथेंच!" म्हणून लष्करी आज्ञा क्रूर व कठोर ध्वनीनें सुटून तो डबा व सावरकर घेरले गेले!!

* * * * *

दुसरे दिवशीं ही बातमी सर्व जगांतील पत्रांत फडकली. सावरकरांच्या मित्रमंडळीवर तर ही अकल्पित वीजच कोसळल्यासारखें झालें. कोर्टांत पोलिसांचा पहारा असतांही लोकांची दाटी झाली. सावरकरांना डॉकमध्यें आणतांच प्रेक्षकांचा आदर अनावर होऊन टाळ्यांचा कडकडाट झाला. इंग्लिश पत्रांनीं फोटो काढण्याचा सपाटा चालविला! सावरकरांस सांगण्यांत आलें कीं, मरण वा जन्मठेप काळेंपाणी या दोनच शिक्षांतून एक कोणची तरी शिक्षा असलेल्या १२१ इं. पि. च्या कलमाखालीं आपणांस धरलेलें आहे!!

इंग्लडच्या ब्रिस्टन जेलमध्यें त्यांस कोंबण्यांत आलें. इथेंच ते डिंगरास भेटावयास मागें आलेले होते. तेथील त्यांच्या दिनचर्येची, त्यांस तेथून पळवून नेण्यासाठीं झालेल्या विलक्षण कटांची, त्यांच्यासाठीं भेटावयास येणाऱ्या स्नेह्यांत लागणाऱ्या चढाओढीची, त्यांच्यावरील खटल्यांतील व अपीलांतील डावपेंचांची, त्यांच्यासाठीं उभारलेल्या फंडांत हिंदीच काय पण आयरिश लोकांनींहि वर्गणी व सहाय्य कसें दिलें त्याची व जज्जांनीं हिंदुस्थानांत त्यास धाडावें अशी शेवटीं आज्ञा केली तेव्हांच्या त्यांच्या भाषणाची अत्यंत मनोरंजक व मर्मभेदक माहिती या संक्षिप्त चरित्रांत सांगतां येत नाहीं यास आमचा निरुपाय आहे.

* * * * *

अखेर इंग्लंडांतून हिंदुस्थानांत विनायकरावांना धाडावें असें अपील कोर्टानें फरमाविलें. हिंदुस्थानांतील कोर्टासमोर जाणें म्हणजे फांशी वा अंदमानला जाणें होय हें निश्चित होतें. म्हणून आपले सालिसिटरहस्तें विनायकरावांनीं आपल्या वहिनीस आपलें "मृत्युपत्र" लिहून धाडलें. आपणांस पुन्हां कोणाला स्वतंत्र पत्र लिहितां येणें व कोणाशीं बोलणें बहुशा शक्य होणें नाहीं. म्हणून या जगतांत आपल्या प्रेमाच्या माणसाशीं उच्चारला जाणारा तो आपला शेवटचा संदेश आहे असें समजून त्यांनीं एक काव्यमय पत्र लिहिलें होतें तें खालीं दिलें आहे:—

## माझें मृत्युपत्र.

**वैशाखिचा कुमुदनाथ नभांत हांसे ॥**
**यच्चंद्रिका धवल सौधतलीं विलासे ॥**
**घाली स्वयें जल जिला प्रिय बाल खासे ॥**
**जाई फुलें चिमुकलीं नटली सुवासें ॥ १ ॥**

आले घरीं सकल आप्त सुहृद् जिवाचें ॥
आनंदमग्न कुल गोकुल काय साचें ॥
आदर्श दीप्ति--शुचिता--धृति--यौवनांचें ॥
पाहूनि जें तरुण--मंडल कीर्ति नाचें ॥ २ ॥

प्रेमें हृदें विकसलीं नव यौवनाच्या ॥
गंधें सुवासित उदात्त सुसंस्कृतीच्या ॥
दिव्यालता तरुंसि जें गृह बाग झाला ॥
ज्या पौर हर्षित वदे जन ' धर्म--शाला ' ॥ ३ ॥

स्वैंपाक त्वां निजकरें कुशले करावा ॥
प्रेमें तुझ्या अधिकची सुरसाल व्हावा ॥
संवाद सर्व मिळुनी करितां नितांत ॥
जेवावयासि बसलों जइं चांदण्यांत ॥ ४ ॥

श्री रामचंद्र वनवास कथारसाला ॥
कीं केंवि देश इटली रिपुमुक्त झाला ॥
तानाजिचा समरधीर तसा पवाडा ॥
गावा चितोरगड वा शनवार वाडा ॥ ५ ॥

झाली कशी प्रियकरा अपुली अनाथा ॥
दुर्दास्यखिन्न शरछिन्न विपन्न माता ॥
शोकें विवंचुनि तिच्या जइं मोचनाचे ॥
केलें अनंत तरुणा उपदेश साचे ॥ ६ ॥

तो काल रम्य, मधुरा प्रिय संगती ती ॥
तें चांदणें, नवकथा--रमणीय रात्री ॥
तें ध्येय दिव्य निजमातृ--विमोचनाचें ॥
तो उग्र निश्चयहि, ते उपदेश साचे ॥ ७ ॥

ासांस मारलें आहे. पण त्यावेळेस कोणी इंग्लिश लोक
र्णय होण्यापूर्वी अशा सभा करतात कीं काय? क्वचित्
माणेंच दारूचे गुंगींत हें कृत्यही झालें असेल! काय तें
: तोंपर्यंत स्वतः इंग्लिश लोकांनीं डिंगराच्या निषेधाची
ःविली नसतां त्याच्याच देशबांधवांनीं स्वतःच न्यायालय
ष्पणा प्रदर्शवूं नये अशी आपण ठरावास उपसूचना आणणार
मतानें ठराव ग्राह्य म्हटलें असतें म्हणजे झालें असतें! पण
· करतां काल्पनिक बॉंब गोळ्यांचीं चित्रें पाहून सगळे
पळापळीस आरंभ केला व अन्यायानें मजवर आघात
टाइम्समध्यें येतांच शिवराळ पत्रें धूप बसलीं व कोणी
ि समर्थनही केलें. सुरेंद्रनाथ बानर्जी यानंतर जेव्हां विला-
ईस आले त्यावेळीं राष्ट्रमताच्या प्रतिनिधीनें त्यांची भेट
ीं स्पष्ट सांगितलें कीं, सावरकरांचें म्हणणें अगदीं न्याय्य
केलेला आघात हा अत्याचार होता!

* * * *

ोक्यांत घाव लागलेला होता त्या निमगोऱ्या साहेबास चैन
गोऱ्या साहेबांत मिसळण्याची ही अपूर्व संधि आहे असें
प्रसिद्ध केलें कीं, मीच तो गृहस्थ कीं ज्यानें सावरकरांस
Britise blow!" एक अस्सल ब्रिटिश ठोसा
बदमाष प्रौढीस दुसऱ्याच दिवशीं टाइम्समध्यें "ब्रिटिश
भंग करणारी " a Straight Indian Lathi
ाठी!" या सहीनें एक चरचरीत उत्तर दिलें गेलें!

* * * *

लंडनचे पोलीस हिंदी तरुणांचे मागें छायेसारखे लागले.
खालीं हिंदी तरुणांनींही स्काटलंड–यार्ड ह्या लंडनच्या

पोलिसच्या मुख्य ठाण्याला पुरे पुरे केलें. त्या गमती सांगूं लागलें तर एक ग्रंथ होईल. इतक्यापर्यंत तोंडीस तोंड उठत गेली कीं, कधी कधीं पोलिसांनीं हिंदी संस्थेंत डिटेक्टिव्ह घुसवावेत तर कधीं हिंदी तरुणांनीं पोलिसच्या ऑफिसांत आपले डिटेक्टिव्ह ठेवावेत. कांहीं विश्वासूक हिंदी तरुण पोलिसांमध्यें डिटेक्टिव्ह म्हणून नौकर राहून त्यांचाच पगार खाऊन उलट त्यांची बित्तं बातमी सावरकरांस पोंचवीत व उलट सावरकर सांगतील तितकीच बातमी व कधीं कधीं तर पोलिसांस भलत्याच मार्गांत फसविणारी बातमी ते नेऊन पोलिसांस देत. उत्तर हिंदुस्तानांत प्रसिद्ध असलेले असे एक कार्यकर्ते आहेत कीं, ज्यांच्याबद्दल ते पोलिसांमध्यें आहेत अशी वदंता मोठमोठ्या लोकांत पसरली होती. त्यांना स्वतः विचारतां त्यांनीं स्पष्ट असेंही सांगितल्याचें नागपूर कॉंग्रेसमध्यें आमचे ऐकण्यांत आलें कीं, होय; मी लंडनमध्यें पोलिसखात्यांत नौकर होतों. परंतु तो लोकपक्षाच्या बातम्या देण्याकरतां नव्हे तर गुप्त पोलिसांच्या बातम्या लोकपक्षाला देण्याकरतां होतों. व खुद्द सावरकरांच्या संमतीनें मला ही कामगिरी (Duty) सांगितली गेली होती. त्या वेळीं लंडनमध्यें असलेले गृहस्थ असेंही सांगत होते कीं, असाच एक गृहस्थ लंडन गुप्त पोलिसांत असतांना तो उमगला गेला व त्यास पकडण्यास वारंटही सुटलें होतें, तोंच त्यांस ही बातमी कळून तो रात्रीचे रात्रीं पॅरिसला निसटून गेला. हे एक मद्रासी गृहस्थ होते व हल्लीं ते तिकडेच आहेत असें म्हणतात.

* * * * *

त्या हिंदी तरुणास रहावयास जागा नाहीं, शिकावयास शाळा नाहीं, बोलावयास कोणी धजत नाहीं, घरचे कोणी संबंध ठेवीत नाहींत व अहर्निश देशासाठीं झटत, झगडत असतां, लोकांस त्याचें नांव माहीत होऊन मिळणाऱ्या कीर्तीचेंही, गुप्तपणें काम करावें लागल्यानें लवलेश समाधान नाहीं. पण अशा स्थितींतही त्यांनीं त्याचें व्रत अखंड व अधिकच नेटानें चालविलें.

प्रतिरात्रीं निजावयास जावयापूर्वी दिवसा केलेल्या खटपटींचा आढावा काढून व उद्यां करावयाच्या खटपटी व कामें वाटून घेऊन ते उभे राहात व गंभीरपणें आपल्या राजकीय प्रतिज्ञांची Their political catechism ची त्यांच्या राष्ट्रव्रताच्या ब्रीदांची घोषणा करीत सर्वजण एक स्वरानें उच्चारीत!" हिंदुस्थान स्वतंत्र झालेंच पाहिजे ! हिंदुस्थान एकराष्ट्र झालेंच पाहिजे ! हिंदुस्थान लोकसत्ताक झालेंच पाहिजे ! हिंदुस्थान एकभाषी झालेंच पाहिजे ! हिंदुस्थान एकलिपिक झालेंच पाहिजे ! ती लिपी नागरी होय. ती भाषा हिंदी होय. ती लोकसत्ता म्हणजे राजा वा अध्यक्ष यापैकीं कोण वरणीय हा प्रश्न नसून राजा असो वा अध्यक्ष असो तो लोकांनीं निर्वाचित केलेला व तो निर्वाचित आहे तोपर्यंतच अस्तित्वांत राहाणारा ज्या राष्ट्र संस्थेंत असतो ती राष्ट्रसंस्था होय ! "

* * * * *

सांगणेंच नलगे कीं, जर सर्वसाधारण देशसेवकांच्या मागें इतकें पोलीस लागलेलें होतें तर त्यांनीं सावरकरांच्या मागें जाचाची परमावधीच केलेली असेल ! सावरकरांस घरच्या प्रियजनांचीं पत्रें मिळण्याचीही चोरी झाली ! दरमेलनें कोणी तरी प्रवासी त्यांच्या कुटुंबावर गुदरलेला कोणचातरी नवा अनर्थ येऊन सांगे. त्यांच्या दूरदूरच्या आप्तांसही छळण्याचा सपाटा चालला. कोणाच्या नौकऱ्या गेल्या ! कोणाचे धंदे बुडाले ! कोणाच्या मत्ता व सर्व धन जप्त झालें. त्यापैकीं कोणी शिव्यांची लाखोलीही वाहूं लागले व या कुळकलंकानें आह्मांस नागवलें म्हणून म्हणूं लागले ! कोणाशीं बोलूं जावें तर तो तोंड फिरवी, कोठें उतरावयास जावें तर डिटेक्टिव्ह डोळे वटारतांच त्या घरवाल्यानें अथवा खाणावळवाल्यानें त्यांस दार बंद करावें, एकदां तर असेंच बिऱ्हाड-पैसे देऊन ! पहातां पहातां थकून अखेर एका हाटेलांत स्थळ मिळालें. सामान आणून खालच्या खोलींत ठेवून हुश्श करून ते बसले. त्यांचा एक प्रिय मित्र होता तोही त्या दिवशीं येऊं शकला नाहीं. भाकट्या

नव्या India new and old या पुस्तकांत पुन्हां ते त्या पुस्तकांतील उतारे देऊन सावरकरांसंबंधीं ह्मणतात कीं, "He was one of the most brilliant adovocates of a later rebellion."

* * * * *

सत्तावनचें स्वातंत्र्ययुद्ध इंग्लिशमध्यें प्रसिद्ध होतांच विनायकरावांनीं मराठीमध्यें शीख जातीचा एक सुंदर इतिहास लिहिला. पण विनायकरावांच्या लेखणीचे व कृष्णमाता देवकीचे ग्रह जवळ जवळ सारखेच असावेत. कारण देवकीच्या गर्भाप्रमाणेंच त्यांच्या लेखणींतून पुस्तक उपजलें न उपजलें कीं तें विपक्षीय क्रोधाग्नीनें धरून व सेन्सारच्या शिळेवर आपटून नामशेष केलेंच म्हणून समजावें! शिखांचा इतिहास केवळ ऐतिहासिक वाङ्मय होतें पण विनायकरावांचें नांव तें लोकांत चालवील ह्मणून सेन्सारच्या शिळेनें पोस्टाच्या पेटीच्या कंठांत तें गिळंकृत करून टाकलें.

* * * * *

इंग्लंडमधील चार वर्षांच्या विनायकरावांच्या चळवळींचा व त्यांच्या भगीरथ प्रयत्नांचा सर्व इतिहास देणें हें आज अशक्य आहे. त्यांनीं त्या चार वर्षांत शब्दशः एकही दिवसाचा, एकही क्षण वांया न दवडतां, वर रात्रींतील विश्रांतीचेंही अनेक तासभर घालून या आपल्या हतभाग्य मातृभूमीच्या उद्धाराकरतां जे भगिरथ प्रयत्न केले, जीं जीं साहसें आचरिलीं, जे जे स्वसुखाचे होम केले, ते ते सर्व रीतीनें आपणांस ज्ञात व्हावे ह्मणून जरी उत्कट इच्छा उत्पन्न होत असली तरी साधनाभावीं ती पूर्ण होणें आज अशक्य आहे. वर दिलेली माहिती सागरांत एक बिंदु या मानानेंच आहे. गेल्या वीस वर्षांत अखिल महाराष्ट्रांत व अखिल हिंदुस्थानांत जे जे थोर कर्तृत्ववान्, शीलवान्, स्वार्थत्यागी देशभक्त निपजले व ज्यांनीं भारतमातेसाठीं स्वसुखत्यागापासून स्वदेह त्यागापर्यंत सर्व दिव्यें करून दाखविलीं त्या बहुतेक सर्वांचा संबंध व अनेकांची स्फूर्ति विनायक-